# वैद्य दप्तरांतून निवडलेले कागद



## खंड ३

सन १७४१



संपादक—
शंकर लक्ष्मण वैद्य,
३७६ बुधवार पेठ, राममंदिर, पुणें नंबर २



शके १८७०



किंमत तीन रुपये

# अनुक्रमणिका

## लेखन-संशोधन चालू असतांना



**श्री. शंकर लक्ष्मण वैद्य**

[ फोटो : ता. १ सप्टेंबर १९४८. मिति श्रावण वद्य १३ शके १८७० ]

# प्रस्तावना

या खंडाची प्रस्तावना लिहितांना विषयाचा क्रम पुढीलप्रमाणें ठेविला आहे: १ सनदा, आज्ञापत्रें व मामले; २ पत्रें:-(अ) वैद्यांना आलेलीं पत्रें, (ब) त्यांनीं लिहिलेलीं पत्रें व (क) इतर पत्रें; ३ हिशोब जमाखर्च, खतावण्या; ४ पावत्या; ५ याद्या; ६ लढाया; ७ देवालयें; ८ वैद्यांचे मुक्काम; ९ महत्त्वाच्या पुरुषांचीं पत्रें. (अ) अमात्य (मुजुमदार). (आ) भोसले (सेनासाहेबसुभे, वगैरे). (इ) पंतसचीव (सुरनीस). (ई) हणमंते (सुमंत), (उ) आंग्रे (सरखेल, व वजारतमाव). (ऊ) प्रतिनिधि. (ऋ) सोमवंशी (सरलस्कर). (ॠ) नागोजीराव पाटणकर. (ऌ) गोविंद सामराज वडगांवकर. (ॡ) सिलिमकर. (ए) निंबाजी वायेसे. (ऐ) गोसावी. (ओ) राघोबा दरवे. (औ) शंकाजी कानो (अं) कोल्हटकर. (अः) इतर कारकून वगैरे.

प्रत्येक विषयासंबंधीच्या कागदांत दुसऱ्या विषयांचा संबंध येणें साहजिक आहे. यामुळें ही विषयवारी अगदीं बिनचूक करतां आली नाहीं, हें कबूल करणें भाग आहे. महत्त्वाच्या पुरुषांच्या कागदांची निवड करतांना प्रथमतः अष्टप्रधान, सरंजामदार, व सरदार घेऊन नंतर कढवय्ये, बातमीदार, सावकार व कारकून घेतले आहेत. या सर्वांचा वैद्यांशीं पैशाचा व्यवहार असल्यामुळें त्यांच्या पत्रांत कांहीं हिशोब व जमाखर्चही निवडावे लागले आहेत. पैसे देण्याच्या व वसूल करण्याच्या पद्धतीचा अभ्यास करण्यासारखा आहे. शिक्के व मोर्तबही देण्याचा प्रयत्न केला आहे. संशोधनाचा मार्गही दिसून आला, त्याचा उल्लेख मधून मधून केला असून जुन्या अपरिचित शब्दांचे अर्थही दिले आहेत.

मराठी राज्यांतील कर्तबगार पुरुषांचीं पत्रें मी निवडलीं आहेत व ही संख्या उत्तरोत्तर वाढत जाणार. त्या माणसांचे वंशजांपाशीं कांहीं जुनें दप्तर असण्याचा संभव आहे, तें मिळाल्यास त्यांत पुष्कळ ऐतिहासिक माहिती मिळूं शकेल. त्याचें संशोधन होणें जरूर आहे. पुष्कळ घराण्यांतील दफ्तर निरनिराळ्या कारणांनीं नाहींसें जाहलें असलें तरी अजून कांहीं घराण्यांत तें सापडेल अशी माझी खात्री आहे. संशोधकांनीं निराश होऊं नये.

१ सनदा:— मेडदऐवजीं बऱ्हाणपूर गांव सोमवंशींनीं वैद्यांस इनाम दिल्याबद्दल १।१०।१७४० तारखेचें सनदपत्र आहे. गांव ताब्यांत आल्यावर वैद्यांनीं मोकदमाकडून जी कबुलायत घेतली ती नं. २ च्या कागदामध्यें आहे. त्या काळीं जी कबुलायत घेत त्याचा हा नमुना म्हणून दिला आहे. यावर कुलकर्णी, देशमुख व देशपांडे यांच्या साक्षी घेतल्या आहेत. 'कालतया' शब्दाचा अर्थ समजत नाहीं. नं. ३६ हें आज्ञापत्र सुभेदार व कारकून यांस वैद्यांना बऱ्हाणपूरचा बाबती मोकासा देण्याबद्दल पंतसचिवांनीं काढलेलें आहे. यावर मोर्तब आहे. नं. ५५, ५६, ५८ व ५९ ह्यांत रामाजी नाा वाकडे यांजकडून नांदेडच्या सरदेशमुखी, साहोत्रा व बाबती या रकमा वसूल करण्याचा मक्ता काणे बंधूंनीं घेऊन त्याबद्दल करार केला व त्याची फेड पुरुषोत्तमभट शेवडे व वैद्य बंधू यांच्या साहाय्यानें कशी केली हा गुंतागुंतीचा व्यवहार वाचण्यालायख आहे. नं ६९ व ७० ह्यांत रघूजी भोसले यांनीं ठ्यारठाणे परगणे येदलाबाद हा गांव वैद्यांस इनाम दिल्याबद्दल मोकादम, देशमूख व देशपांडे यांस कळवून तो चालविण्याबद्दल हुकूम दिले आहेत. हा गांव पालखीचे खर्चासाठीं दिला होता. हल्लीं वैद्याकडे तो गांव नाहीं. ह्या आज्ञापत्रावर रघूजीचा शिक्का व मोर्तब आहे.

नं. ७८ मध्यें **शाहूमहाराजांनीं वैद्याना** प्रांत **दाभोळकडे** दिलेली ११ महालांची सरमोकदमीची सनद आहे. हें एक वतनच होतें. शाहू रोजनिशींतील ही सनद आहे. वतनदारास काय काय हक्क असतात हें त्यांत दिलेलें आहे. हें वतन सध्यां **वैद्यांकडे** चालू नाहीं. अशीं वतनें अजून **कोंकणांत** चालू असतील असें वाटत नाहीं.

**२ पत्रें:—(अ) वैद्यांना** आलेलीं पत्रें कांहीं महत्त्वाचीं आहेत. नं. १ व २५ च्या कागदांत **शरीफजी राजे भोसले** यांचा उल्लेख आहे. **हे छत्रपतींचे** नातलग असून यांचा **वैद्य, नरसिंगराव जगताप** व **पंतसचीव** यांजपाशीं देवघेवीचा संबंध दिसतो. **हे गोवलकोट**च्या लढाईवर गेले होते. या पत्रांत **संताजी जाधव** यांचा उल्लेख आहे. त्यांचें नांव **गोवलकोट**च्या लढाईवर गेलेल्यांमध्यें आढळून येतें. हा जाधव **सिंदखेडच्या जाधवां**च्या वंशावळींत **अचलोजी**चा मुलगा दिला आहे व तो कनकगिरीच्या युद्धांत मेल्याचें दिलें आहे. पत्र नं. ८ मध्यें **चितळे, चिवटे** व **रास्ते** या नाईक सावकारांच्या देवघेवींची हकीगत आहे. **चितळ्यांनीं वैद्याना** कबूल केल्याप्रों रु. २४०० चा ऐवज त्यास मागितला. त्यासाठीं **मुतालिका**तर्फे चिवटे यास पाठविलें होते. यावरून ही रक्कम मुतालिकास देणें असावी. रास्ते यांजकडून **वैद्यांचे** पैसे येणें होते. लष्करांतून कारकून आल्याखेरीज पैसे मिळत नाहींत असें समजलें. **सदाशिव, भिकाजी व हरबाजी** त्रिवर्ग रास्ते बंधु **शामजी**चे मुलगे. यांसच **सामराज**ही म्हणत. **मावळ**प्रांताचे सुभेदार **गोविंद सामराज** यांचीं पत्रें बरींच या खंडांत दिलीं आहेत. **सामराज** म्हणजेच शामजी असें पे. द. ४४.११. व ३६ यांत दिलें आहे. नं. १४ मधील **गोडबोले** ह्यांचें नांव कोंकणांतील महादाजी अनंत विजयदुर्ग किल्ल्यावरील अमलदार म्हणून आलें आहे. यावेळी त्यांनीं **वैद्यांना माहादाजी ना निंबाळकरांशीं** देवघेवीचा व्यवहार करण्यास सल्ला दिला आहे. **निंबाळकर हे पंतप्रधानांचे** विश्वासूक सामंत होते. त्यांचा दर्जा हत्ती बाळगण्याजोगा होता. पैशासाठीं **वैद्याकडे** ते हत्ती गहाण ठेवीत आहेत. नं. ३० मध्यें **महाराजांनीं** आपला मुक्काम फलटणास असल्याबद्दल **वैद्यास** लिहिलें आहे. **रघूजी कर्नाटकांतून** परत आला, तेव्हां त्यास ते यावेळीं सामोरे गेले असावे. **बाळंभट जेजुरीहून फलटणास** गेल्याचा जमाखर्चांत उल्लेख आहे. हें पत्र अस्सल नसून नक्कल आहे. नं. ४७ चें पत्र **कृष्णंभट नवाथे** याचे असून त्यांतील मजकुरावरून यांचा व **वैद्याचा** फार घरोब्याचा संबंध दिसतो. पुरवणी खंड १ मधील याच्या संबंधाचीं पत्रें पाहतां हा **वैद्याकडून** पैसे घेऊन बरीच देवघेव करून पैसे मिळवी, असें दिसतें. १७४० मधील नं. २७ च्या कर्जदारांच्या यादींत त्याचें नांव आहे. नं. ५० मध्यें **रामचंद्रपंत करकरे** यांनीं कर्जदारांकडील वसुलीची हकीगत कळविली आहे. यांतील सर्व लोक नवे देवघेव करणारे आहेत. याच वेळीं **वैद्यांचे** वाईचें घर तयार झाल्याचा यांत उल्लेख आहे. नं. ७२ मध्यें **बापूजी गणेश जोग** यानें **कोंकणांतील** पिकपाण्याची हलाखीची स्थिति दिली आहे. हें साल दुष्काळाचें असावें.

**(ब) वैद्यांनीं** लिहिलेल्या दोन पत्रांचा उल्लेख करण्यासारखा आहे. त्यांनीं लिहिलेलीं आणखी पत्रें आहेत त्यांचा खुलासा त्यांत आलेल्या इतर विषयांत केला आहे. **बीड व अंबड हे मामले वैद्यांचे** कर्जफेडीसाठीं **सचिवांनीं** लावून दिले होते. त्याचे हप्ते ठरले होते. ते वेळेवर न आल्यामुळें लवकर पाठविण्याबद्दल तेथील दोन मुकासदारांना नं. १५ चें पत्र आहे. ह्यांचीं नावें **सचिवांच्या** दफतरांत सांपडणें शक्य आहे. नं. ३९ ह्यांत **गंगाजी कंक** याला तांदूळ खरेदी करून पाठविण्याबद्दल रु. ४० दिले होते.

२।३ वर्षें होऊन गेलीं तरी तांदूळ नाहींत व पैसेही नाहींत म्हणून तगादा केला आहे. या पत्रावर वैद्यांचा शिक्का व मोर्तब आहे. शिक्यांतील मजकूर 'श्री राजा शाहुचरणी तत्पर रघुनाथ सुत वीश्वनाथ नीरंतर' असा असून आरंभीं ० ‿ अशीं सूर्यचंद्राचीं चिन्हें आहेत. नं. ८६ हें पत्र हैबतराव सोमवंशीस पैशाच्या तगाद्याबद्दल असून त्यांत नागोबा ब्राह्मणास लग्नास मदत करण्याबद्दल शिफारस आहे.

(क) यांत पत्राचें लेख्य व लेखक तिऱ्हाइत असून वैद्यांच्या देण्याघेण्याचा संबंध आला आहे, व इतर महत्त्वाच्या व्यक्तींचा उल्लेख आहे अशीं ३ पत्रेंच आहेत. नं. २८ पत्रांत गोविंद केशव साठे यांनीं वैद्याचा दिवाण रामचंद्रपंत करकरे यास पैशाच्या हिशोबाबद्दल मजकूर लिहिला आहे. शिवाय गोविंद ना। दातार यास, बारामतीकर नानाजी ना। जोशी यांजकडून २०,००० पुण्यास व साताऱ्यास आलेले रुपये द्यावयाचे कीं काय म्हणून विचारलें आहे. दाताराची मोठी सावकारी होती, व नानाजी ना। जोशी यास वऱ्हाडांतील कांहीं गांव किंवा रोख रक्कम दरसाल मिळत असावी असें दिसून येतें. या गोविंद केशवाचें नं. २१ चें पत्र लक्ष्मण बल्लाळास आहे. त्यांत पंतसचिवांची पैशाबद्दलची चिठी परतविली व ३००० ची चिठी पाठविली, त्यांचे रु. कृष्णाजीपंताकडून घेऊन देतों वगैरे मजकूर आहे. हा साठे वैद्यांचा कांहीं दिवस नोकर असावा असें दिसतें. या पत्रांत साठे हें आडनांव नाहीं तें दफ्तरांत शिवराम गदाधर यांनीं सचिवाच्या पैशाबद्दल लिहिलेल्या एका पत्रांत दिलें आहे. ह्या पत्रावर मिति ज्येष्ठ शु. ५ शके १६७१ आहे. पत्र नं. ३७ हें रत्नाकर विठ्ठल यानें आपल्या कारकुनास कराडच्या बाजारांत हरभरे घेऊन वैद्यांस पाठविण्याबद्दल लिहिलें आहे. हे कारकून खोडदचे असावे असें वाटतें. या पत्राचें महत्त्व रत्नाकरपंतांचें स्वतःचें अक्षर शेवटीं व श्रीकारापुढें असल्यामुळें आहे. पत्र नं. ७५ हें बसवंतराव खासखेल यांनीं भोर संस्थानांतील खेडेबाऱ्याचे कमाविसदारास सिंहगडाखालीं वैद्यांनीं घेतलेले तांदूळ, शिवापूरच्या वाण्यास योग्य भाडें देऊन साताऱ्यास रवाना करण्याची तजवीज करण्याबद्दल लिहिलें आहे. पत्रावर बसवंतरावाचा शिक्का व मोर्तब आहे. त्याचें स्वतःचें अक्षर शेवटीं असावें असें वाटतें.

३. हिशोब :— हे १० कागद निवडले आहेत. त्यांत राणोजीनें वैद्यांकडून घेतलेल्या कर्जाबद्दल २ हिशोब आहेत. नं. ६ वरून असें निघतें कीं, वैद्यांनीं त्यास कबूल केलेला रु. १२५०० चा हप्ता होता. वऱ्हाडचा मामला १७४० मध्यें रत्नाकर विठ्ठल व वैद्य यांनीं राणोजीकडून घेतला होता. गोसाव्यांशींही यांची देवघेव होती. गणोबा ना। पैठणकर हा एक नवीनच सावकार यांत आला आहे. नं. ७३ मध्यें संक्राजी राणोजीचा दिवाण उर्फ मुखत्यार दिला आहे. नं. १० हा केसो महादेव वैशंपायनाचा हिशोब आहे. याची पैशाची देवघेव वैद्यांबरोबर १७३७ पासून आहे (पु. खं. १·५१). त्रिक्रम-शेट गोविंदजी (गुजर) या महत्त्वाच्या सावकाराचा उल्लेख यांत आहे. त्रिचनापल्लीच्या लढाईची नं. २९ मध्यें ज्यानें हकीगत लिहिली आहे त्या निळो रघुनाथाचा केसो महादेव जवळचा नातलग असावा. नं. ४१ हा आप्पाजी सोमवंशी सरलस्करचा हिशोब आहे. त्यानें प्रतापजी सोमवंशी, मदनसिंग भोसले, निंबाजी वायेसे व रघूजी भोसले यांस पैसे देवविले आहेत. रघूजी भोसले यास रु. २०००० देवविले, त्याचा चंदाखानाच्या रकमेशीं संबंध दिसतो. कांहीं वैद्यांचे खाजगत हिशोब क्षुल्लक वाटण्याजोगे आहेत, पण त्यातही पुढील गोष्टी समजून येतात. भास्करभटांची बायको सखूबाई काशीस (वाराणशीस) गेली असतां तिला खर्चासाठीं रु ५०० ची हुंडी पुरुषोत्तमभट शेवडे

यांजकडून व रोख रु. २१०१२ पाठविले होते ( नं. ६६ ). **अंताजी ना। भिडे** यांजकडून रु. ५००० घेऊन **राघूजीस** दिले ( नं. ६७ ). नं. ६८ हा **रघूजी भोसल्या**चा हिशोब ९ वर्षांचा आहे. यांत त्याचेकडे रु. ५५९८६ बाकी दाखविली आहे. १७४१ मध्यें कंठीच्या मोत्याचें रु. ४२०० दिले आहेत ; १७४६ मध्यें **प्रतिनिधींना** रु. ६००० दिले; यांतील रु. १०००० ची रक्कम **चंदाखानाच्या** रकमेपैकीं आहे. **रघूजीनें वैद्यांस** ७ गहाणखतें कर्जाबद्दल दिलीं होतीं. नं. ७४ च्या हिशोबावरून '**बेरीज मुशाहिरा**' यांत कशाचा समावेश होतो हें कळतें. 'मुशाहिरा' म्हणजे मजुरी असा नेहमींचा अर्थ आहे. **यमाजी शिवदेवा**चा कारभारी **गंगाधर परशुराम सोमण** होता. त्यांनें **विश्वनाथभटास** शिकारींत रु. ४ दिले, यावरून त्यांना शिकारीचा नाद असावा. '**परवानगी राजश्री स्वामी**' या खात्याचा अर्थ काय ? **रामाजी** अनंत हा दाभोळकर असावा. (नं. ७६ ). हिशोबाच्या कागदांत व्याज आकारलें असून व्याजाचा दर दरमहाचा दिलेला आहे व तो सध्यांच्या मानानें फार जास्त आहे. व्याजांत १/१२ ( बारोत्रा ) वजा करण्याची सररहा चाल दिसते. ही केव्हांपासून बंद झाली कळत नाहीं. बाकी दाखवितांना कांहींत सूट दिली आहे. हिशोब वरचेवर करून बाकी काढण्याची चाल असे.

४ पावत्या :—नं. १३ व ३२ या **वैद्यास** दिलेल्या पावत्या **सचिवांनीं** देवविलेल्या पैशाबा। आहेत. नं. १३ मध्यें दा।बा।. असा शब्द आला आहे. दा। हा संक्षिप्त शब्द दस्कत, किंवा दस्तक या शब्दांबद्दल लिहितात. या पत्रांत दा। म्हणजे दस्तक असा अर्थ आहे. त्याचा अर्थ परवाना करार, पुरावा, आज्ञापत्र असा कोशांत आहे. त्यांपैकीं करार हा अर्थ येथें युक्त आहे. नं. ३३ ही पावती **नागोजी झुंजारराव घाडगे** यांनीं **गणोबा ना। कोलटकर** यास **महाराजांनीं** देवविलेले रु. २००० पोंचल्याबद्दल दिली आहे. पण हे रु. **महाराजानीं वैद्यांस** देण्यास सांगितलें होतें, ते त्यांनीं **कोलटकर** यांजकडून चिटी देऊन देवविले. **घाटगे** यांनीं **नलावडे** व **संगीरराव** यांचेकडून ते आणविले. त्याबद्दलची एक पावती **वैद्यबंधूंस** दोघांनीं दिली आहे. हे रुपये **कोलटकर** यांनीं **त्रिकमजी गोविंदजी गुजर** यांचे दुकानीं त्यास देण्यासाठीं ठेविले होते. हे व्यवहार कसे घडून येत हें पाहण्यासारखें आहे ( नं. ३५ ). नं. ३८ ही पावती **निर्मलगिरीमहंत** यांनीं **राणोजी भोसल्यांनी** देवविलेले रु. ४००० मिळाल्याबद्दल दिली आहे. हे रुपये **वैद्यानीं** हुंडीच्या पद्धतीनें **पुरुषोत्तमभट शेवडे** व **गोसावी ना। अनभळ** यांजकडून देविले आहेत.

५. याद्या :—नं. ४५ व ५७ हे कागद याद्यांसारखेच आहेत. नं. ४५ च्या फेरिस्तांत **मावळ** प्रांतांतील कर्जदारांचें फेरिस्त दिलें आहे. ह्या यादींतील लोकांपाशीं **वैद्यांचा** देवघेवीचा जुनाच व्यवहार होता. खंड २-२७ च्या यादींत यांचीं नांवें आहेत. या सर्व लोकांनीं १७४१ सालीं केव्हां कर्ज काढलें हे या यादींत आहे. **बाळाजी विश्वनाथ चाफेकर हें नांव चाफेकर** घराण्याच्या पुस्तकांत आहे. पण साल दिलें नाहीं. कर्जाच्या आंकड्याच्या मागें जे आंकडे दिले आहेत त्याचा अर्थ कळत नाहीं. त्याची बेरीज २७ आहे. नं. ५७ ही **सेनासाहेब सुभ्याकडून** येणें रकमेची याद आहे. **रघूजी भोसले** यांनीं ज्यांना पैसे देवविले त्यांचीं नांवें यांत आहेत. या सालचे महिनेवार जमाखर्चांचे ताळेबंद दफ्तरांत आहेत. त्यावरून कागदाची मिति लावतां आली. **रघूजीनें रामदास** परळी, यांस रु. ५०० दिलेले यांत आहेत. या वेळीं स्वामी नव्हतेच. त्यांचे पुतणे **शामजी बाबाजी** यांस हे दिलेले असावे. भोसल्यांचा स्वामीबद्दलचा पूज्य भाव दिसून येतो. ही दरसाल देणगी असावी.

६. **लढाई**:—नं. २९ च्या पत्रात **त्रिचनापल्लीच्या** लढाईचें सविस्तर **वर्णन आहे**. हें पत्र रा. ब. **सरदेसाई** यांस माझ्या दफ्तरांत वाचावयास मिळाल्यावर त्यांनीं पुढें काय केलें हें खंड १ मध्यें दिलेलें त्यांचें पत्र वाचलें असतां कळून येणार आहे. या पत्रानें ऐतिहासिक माहितींत काय जास्त भर पडली व **वैद्यदफ्तर** किती महत्त्वाचें आहे हें त्यांनीं 'मॉडर्न रिव्ह्यूत' पत्र लिहून प्रसिद्ध केलें. हिस्टॉरिकल कमिशननें ह्या दफ्तरांतील ऐतिहासिक कागदांचें संक्षिप्त वर्णन प्रसिद्ध करण्यास काय खर्च येईल हें ठरविण्यास कमेटी नेमिली व तिनें रिपोर्ट अनुकूल केला, त्यावरून मला माझे कागद छापून प्रसिद्ध होतील अशी आशा वाटूं लागली होती. पुढें मीं वरिष्ठ सरकार व प्रांतिक सरकार यांशीं पत्रव्यवहार केल्यावर जो अनुभव आला आहे त्यावरून उत्सुकतेच्याऐवजीं औदासीन्यच सरकारचे ठायीं दिसून येतें. म्हणून मीच छापतां येतील तेवढे कागद छापीत आहें. आणखी लढाईचे कागद उल्लेख करण्यासारखे या सालांत नाहींत. हें लढाईचें पत्र **निळो रघुनाथ** यानें लिहिलें आहे. यांचें आडनांव **वैशंपायन** असावें. हा **पेशव्यांचाही** बातमीदार होता. त्याचीं तीन पत्रें असून नं. १२ हें **पुरुषोत्तमक्षेत्राहून** आलें आहे. त्यात वैद्यांच्या कर्जफेडीची हकीगत आहे. नं. २९ हें पत्र **त्रिचनापल्ली** सोडल्यावर लिहिलें आहे. त्या पत्रांतील लक्षांत ठेवण्यासारख्या बाबी म्हणजे **त्रिचनापल्ली** रामनवमीस हस्तगत केली. **रघूजी भोसल्याचा** उद्देश पैसे मिळविण्याचा नसून जागा मिळविण्याचा होता. **फत्तेसिंग भोसले** यांचा ओढा पेशाकडे होता. **चंदाखानाचा** दिवाण **रामराव** २५ लाख रुपये घ्या म्हणत होता. **चंदाखानाचा** भाऊ **बडेखान मदुरेहून** लढण्यास येत होता. त्याजवर **फत्तेसिंगाचे** सरदार **जाधव, पांढरे, भापकर** यांनीं लढून त्यास ठार केलें. **चंदाखानाची** खंडणी ४ लाखांपर्यंत नेली. पण तें कांहीं घडून न आल्यामुळें **भास्करराम कोल्हटकर** त्यास **वऱ्हाडात** घेऊन गेले. या मोहिमेनंतर **रघूजी** हगवणीनें अत्यवस्थ आजारी होते. मरतां मरतां वांचले. शेवटीं **त्रिचनापल्ली मुरारराव घोरपड्याच्या** स्वाधीन करून **रघूजी** व **फत्तेसिंग साताऱ्याकडे** गेले. **जानोजीस चौकीचंदावरचे** राज्यावर बसविण्यासाठीं **रघूजींनी** बोलाविलें होतें. म्हणून **रघूजींना** जागाच पाहिजे होती. पैसे नको होते असें म्हणण्यास बळकटी येते. या कामीं **महाराजाजवळ** वैद्य आपल्या बाजूनें रदबदली करण्यास चुकणार नाहींत असा **रघूजीस** पूर्ण भरवसा होता. नं. ८० हें पत्र **गलगल्याहून** पाठविलें असून त्यांत **बाळ जोशी गाडळीळ वेळणेश्वर** यास **जानोजी बाबा भोसल्यांनीं** देऊं केलेले रु. ६०० चें वर्षासन वसूल करून देववावें अशी **वैद्यांना** विनंति आहे. **निळो रघुनाथ** यांचा देवघेवीचा **भास्करभटापासून** वैद्य **घराण्यांशीं** संबंध होता असें नं. १२ चें पत्रावरून दिसतें.

७. **देवालयें**:—नं. ४६ वरून असें दिसतें, **वरवड्याहून तिवरेस** जातांना वाटेंत **श्रीनारायणाचें** तळें आहे, तें **वैद्यांनीं नांदिवड्याचे** हरी रघुनाथ जोग यांजकडून बांधविलें. १७४१ मध्यें त्यास लागणारे चिरे तयार करण्यास दिले होते. **नांदिवड्यास वैद्यांचें** राहण्याचें ठिकाण होतें. या वेळीं त्यांची मंडळी तेथें असावी. **अनंतभट दामले** हे **नांदिवड्याचेच** रहिवासी **वैद्यांचेकडे साताऱ्यास** आले होते. **हरी रघुनाथ** हा **रघूजी भोसल्याबरोबर** १७४३ मध्यें **देऊरास चंदाखानास** सोडविण्यासाठीं रक्कम ठरविण्याच्या वाटाघाटींतहोता. याच सुमारास **वरवडे** येथें **महादाजी कृष्ण काणे** यांनीं **वैद्याकडून आदित्येश्वराचें** देवालय बांधविलें. त्यास लागणारें सामान व इतर मदत देण्यासाठीं **भिकाजी**

**राव विचारे** यास **काणे** यांनीं पत्रें लिहिलीं आहेत व त्यांनींही उलट मदत करण्याची कबुली दिल्याचें पत्र आहे (नं. ६३, ७७). अर्थात् **किरिस्तावांनीं** बांधण्याचा मक्ता घेतला होता. **कोंकणांत विचारे हे पेशव्यांच्या** सरदारांपैकीं **महत्त्वाचे** घराणें होतें. **वैद्यानीं सांडे** उ. **गद्रेलावगन** येथेंही **आदित्येश्वराचें** देवालय बांधलें होतें त्यास **राघोबा दरवे** याजकडून देवळास वीट घालण्यासाठीं रु. ५० देवविले आहेत (नं. ८५). ह्या गांवचे हवालदार (खोत) गद्रेच असावे. **अंताजी पंत** व त्यांचे **वंशज हे** कारकुनीपेशांत बरेच वर्षें **वैद्यांचे**जवळ होते.

८. **वैद्यांचे मुक्काम** :—नं. २६ मध्यें **वैद्यांच्या** जमाखर्चाच्या कागदावरून हे मुक्काम काढून दिले आहेत. **बाळंभट वाळवे** तालुक्यांत एप्रिलांत होते. वाईस आल्यावर दोघे बंधु पुण्यास मे महिन्यांत गेले असें दिसतें.

९. (अ) **अमात्य (मुजुमदार)** :—**भगवंतराव रामचंद्र** यांचीं ७ पत्रें आहेत. पत्र नं. ३ मध्यें त्यानें आपलें इनाम गांव **तांदळी** याचा वसूल **पंतसचिवा**कडून मिळत नाहीं तो देण्याबा मदत करण्याबद्दल वैद्यांना विनंति केली आहे. **महाराजांनीं** २१ । ११ । १७३८ रोजीं त्यास या गांवची सनद दिली. त्यास त्या गांवचें कुळकर्णीपणाचें व ज्योतिषीपणाचें वतन दिलें होतें. **शिवाजी नारायण भाट्याचा** या गांवाशीं संबंध असावा. या गांवची सनद तिघा भावांच्या नांवची होती. यांत त्यानें आपल्या हलाखीचें वर्णन केलें आहे. आपल्या मुलास महाराजांच्या दर्शनास पाठविलें होतें असें लिहिलें होतें. **वैद्यांनीं** त्यास कर्ज रु. ४०० दिलें होतें. त्यास **संभाजी आंग्र्यांचा कोंकणांत** व **घाटावर कोल्हापूर** दरबारचा त्रास होत होता. त्यानें आणखी कर्ज वैद्यांना मागितलें होतें. नं. ४३ मध्यें **कोल्हापूर**च्या राजकीय वातावरणाची हकीगत सविस्तर असून चिरंजिवाचे लग्नासाठीं त्यांना कर्ज मागितलें आहे. **जिजाबाई** राणीचें याच्याशीं सूत नव्हतें. स्वतःच्या हलाखीचें वर्णन यांतही केलें असून नं. ४४ चे पुरवणी पत्रांत **बेदरची** तलवार पाठविल्याचा मजकूर आहे. तेथें चांगल्या तलवारी होत असाव्यात. नं. ६०, ६१, ६२ हीं पत्रें **शाहू महाराजांस** लिहिलीं आहेत. यांनाही स्वतःच्या हलाखीचें वर्णन केलें आहे. ह्या पत्रांची भाषा अलंकारिक आहे. तीं वाचण्याजोगीं आहेत. या पत्रांतून अमात्याच्या कारकुनाचीं व जासुदांचीं नांवें आलीं आहेत. त्यावरूनही कांहीं पत्रें ओळखता येतात. बहुतेक सर्व पत्रांच्या शेवटीं स्वतः मजकूर लिहिला आहे. तें वळण ठरीव आहे शेवटचा शब्द विज्ञापनानंतरचा ' लक्षश ' असा आहे.

९. (आ) **भोसले** :—**रघूजी, राणोजी, शरीफजी, फत्तेसिंग, जानोजी मदनसिंग, येसाजी** व **गोंदजी** अशा ८ भोसल्यांचे संबंध असलेले हे कागद आहेत. **शरीफजी भोसले** हें छत्रपतींच्या वंशावळींत **मालोजी**चा मुलगा म्हणून आलें आहे व **शहाजींचा** नातू (**एकोजीचा** मुलगा) म्हणूनही आलें आहे. नं. १ च्या पत्रांत व कागद याद्या, पावत्या, व हिशेब वगैरे सदरांत त्यांचा संबंध आल्यामुळें त्यांचेबद्दल त्यांत जरूर ती माहिती दिली आहे. नं. २५ मधील नांव एकोजीच्या मुलाचेंच असलें पाहिजे. हा वंश तंजावरकर भोसल्याचा आहे (म. रि. शिवाजी पान १७६, १९७). तंजावरचा शरीफजी गोवलकोटच्या लढाईसाठीं कां यावा व सचिवाशीं याचा पैशाचा व्यवहार कां व्हावा या दोन गोष्टींचें संशोधन होणें जरूर आहे. ' पदनसिंग ' हा शब्द ' मदनसिंग ' असाही वाचला जाईल, तो संभाजीचा एक दासीपुत्र होता. त्याची माहिती म. रि. बाळाजी विश्वनाथ पान २७ च्या टीपेंत दिली आहे. दोन्ही नांवें एकाचींच कीं काय याबद्दल संशयनिवृत्ति झाली पाहिजे.

९ (इ) **पंतसचीव** :—यांचे संबंधाचीं १० पत्रें आहेत. त्यांपैकीं ५ चिट्या आहेत. त्या निरनिराळया माणसांस रकमा देण्याबद्दल आहेत. दफ्तरांत पुष्कळ चिट्या आहेत. त्यांपैकीं येवढ्यांची निवड करण्याचें कारण त्या सर्वांवर शेवटीं मोर्तब असून ते निरनिराळया मजकुराचे आहेत नं. १६ व २५ मध्यें 'लेखनावधि' नं. ३१ मध्यें 'पत्राळकी मुद्रिका' नं. ३४मध्यें 'लेखनसीमा' व नं. ४२मध्यें 'पत्रावधि रयं भाति' असा मजकूर आहे. वैद्यांकडून सांगितलेल्या रकमा कर्जफेडीसाठीं, खाजगी खर्चासाठीं व मजुरी देण्यासाठीं आहेत. नं. २५ मधील **शरीफजी राजे भोसले** हा एकोजीचा मुलगा होता त्यास दरमहा **सचिवा**कडून रकम जात असावी. **वैद्यांकडे कर्डे रांजण**गांव हा गांव कर्जासाठीं लावून दिलेला होता. त्यांतून हे पैसे देविले आहेत. यांतील ३ पावत्यांचा 'पावत्या' या सदराखालीं उल्लेख आहे. नं. ४७ चें पत्र **येसाजीमाने** देशमुख परगणे अंबडापूर यानें **सचिवास** लिहिलें असून त्यांत **अटोलियानें** दिलेल्या त्रासाचें परिमार्जन न केल्यामुळें त्यास दोष दिला आहे, पत्राच्या मागें दिलेल्या हिशोबांत अधिक महिना आला आहे. त्यावरून पत्राची मिति ठरविली आहे. **अटोलिया**चा उल्लेख पे. द. ३१·१३० व **वैद्य** द. खंड १.२३ मध्यें आहे. पत्र नं. ४८ हें **वैद्यांचे** ५० बैल कोकणांतून माल घेऊन येतील त्यास अडथळा करूं नये म्हणून **पंतांचा** परवाना उर्फ दस्तक आहे. त्यावर शिक्का **शंकाजी नारायणां**चा आहे हें विशेष आहे. चिमणाजी नारायण व नारोशंकर यानीं आपले शिक्के केले नव्हते असें दिसतें.

९ (ई) **आंग्रे** :—नं. ४ च्या भगवंतराव अमात्याच्या पत्रांत संभाजी आंग्रे या पासून होणाऱ्या त्रासाचा उल्लेख आहे. याशिवाय दुसऱ्या पत्रांत आंग्र्यांचा संबंध आलेला दिसत नाहीं.

९ (उ) **हणमंते** (सुमंत):— **त्र्यंकटराव गंगाधर** यांचा उल्लेख नं. ४९ व ५१ च्या हिशोबांत आला आहे. **त्र्यंकटरावानें वैद्यांकडून** पुष्कळ पैसे वरचेवर कर्ज म्हणून काढलेलें होतें. तरी त्याची देवघेव **प्रतापजी सोमवंशी** व **लक्ष्मण ना। केसकर** यांजपाशींही होती. **हणमंते** घराण्याचे कागद वै. द. खंड २ मध्यें छापले आहेत. पुरवणी खंड १ मधील प्रस्तावना पान ८।९ वर या घराण्याची सविस्तर माहिती दिली आहे.

९ (ऊ) **प्रतिनिधि** :—नं. ५३ हें पत्र **जगजीवनराव** उ. **दादोबा** यांचे विष्णु **विश्वनाथ पंडित** यास रु. ३००० देण्याबद्दल **विश्वनाथभट वैद्यांना** आहे. वै. द. खंड २ मधील पत्र नं. ५७ यांत **कृष्णाजी ना। जोशी** यास रु. ३००० देण्याबद्दल **गणोबा ना। कोलटकरास** लिहिलें आहे. हा **कोलटकर वैद्यांचाच सातारच्या** दुकानांत भागीदार होता. बहुधा वैद्यांकडूनच हें पैसे मिळाले असावे व ते त्यांनीं **पुरुषोत्तमभट शेवडे** याजकडून देवाविले आहेत. प्रतिनिधीपदावर येण्यापूर्वींच हे कर्ज काढीत होतें असें दिसतें.

९ (ऋ) **सोमवंशी** :—नं. ४१,४९,५७,८२ व ८६ या पत्रांत **आपाजी, प्रतापजी** व **हैबतराव** यांचा उल्लेख आहे. हे कागद हिशोब व पत्रें या सदरांत येत असल्यामुळें त्यांत त्यांचा खुलासा केला आहे. या घराण्याबद्दल माहिती **वैद्य** दफ्तर पुरवणी खंड १ च्या प्रस्तावनेंत पान नं. ११ वर दिली आहे.

९ (ॠ) **नागोजीराव पाटणकर** यांचे २ कागद आहेत. नं. ७ हें पत्र त्यांनीं **बाळंभट वैद्यास सातान्यास** लिहून **महाराजाकडून धाररा**व यांचा व

रत्नाकर विठ्ठल यांचा आमच्या बेलवडे गांवास उपसर्ग न लागे असा बंदोबस्त करण्याबद्दल त्यास विनंति केली आहे. बेलवडे गांव नागोजीरावाकडे होता. वैद्यांचें महाराजापाशीं विशेष वजन होतें हें यावरून स्पष्ट होतें. यांत येसाजी भोसल्याचें नांव आलें आहे. तो महाराजांचा लेकावळा होता व त्यास तिकडे उत्पन्नही देण्यांत आलें होतें. या पत्रावर त्यांचा शिक्का व मोर्तब आहे. नं. ९ हा वैद्यांनी पाटणकरास रुा ५०० दिल्याचा हिशोब आहे. त्यांनीं १७४० सालीं वैद्याकडून नेलेल्या पैशाचा उल्लेख खंड २·२७ मध्यें आहे. हे जुनेपुराणे कर्जदार होते.

९ (ऌ) गोविंद सामराज—या घराण्याबद्दल पे. द. ४४. ११ मध्यें यांच्या घराण्यांतील तिघा वंशजांनीं इंग्रज सरकारकडे १८४३ सालीं एक कैफियत दिलेली छापली आहे. त्यांत ह्या कुटुंबाचा इतिहास विजापूरकर पादशाहीपासून दिला आहे. यांतील पुरुषांनीं मर्दुमकी गाजविली आहे व कित्येक धारातीर्थीं पडले आहेत. हें पाहून त्यास प्रांत मावळच्या सुभेदारीचें हें काम वंशपरंपरेचें देण्यांत आलें. यांनीं वैद्यांशीं देवघेवीचा पुष्कळ व्यवहार केला होता. यांनीं मक्त्यानें उत्तर हिंदुस्थानांतील ग्वाल्हेरनरवर वगैरे गांवची मामलत घेतली होती त्यासाठीं वैद्यांकडून हजारों रु. नेले होते. ‘सामराज’ म्हणजेच ‘शामजी.’ रास्ते यांच्या एका ‘शामजी’ पुरुषास ‘सामराज’ म्हटलें आहे. गोविंद सामराजांना १७५० च्या खतावणींत वडगांवकर आडनांव दिलें आहे. यानें कांहीं सबंद पत्रें स्वतः लिहिलेलीं आहेत. यामुळें याच्या पत्राचें वळण पाहून तीं ओळखण्यास कठिण जात नाहीं. गोविंदाचा मुलगा रामचंद्र पे. द. ४४. ११ मध्यें दिलेलें बरोबर नाहीं. तो त्याचा भाऊ असल्याबद्दल पत्रें आहेत (नं. १८, ५२). याचीं एकंदर १० पत्रें आहेत. नं. ५ मध्यें यानें त्र्यंबक कान्होस रु. ११८८ देवविले आहेत. हा शंकराजी कान्होचा संबंधी असण्याचा संभव आहे. नं. १७, १८, १९ मध्यें वैद्यांनीं सुतार, पखाल, पत्रावळी वगैरे लग्नास लागणारे सामान मागविलें आहे, त्याची त्यानें धाकटा भाऊ रामचंद्र यास वडगांवास लिहून तजवीज केली आहे. वैद्याची बहीण जिऊबाई इचें लग्न सातार्‍यास होतें असें वाटतें. नं. १७ मध्यें सचीवपंतांनीं रु. २५०० यांजकडून वैद्यांस देवविल्याचा मजकूर आहे. ते बीडअंबडपैकीं असावे. नं. १८ मध्यें रामचंद्र वडगावास असल्याचा उल्लेख आहे. यावरून या कुटुंबास वडगांकर हें नांव जमाखर्चांत दिलेलें सार्थ दिसतें. नं. २०, २३, २४ व ५२ मध्यें गाळेरनरवरच्या रसदेसाठीं वैद्यांकडून घेतलेल्या पैशाचा व वसुलीचा उल्लेख आहे. नं. २१ व २२ मध्यें पैशाचा तगादा त्यास केला आहे. याच्या पत्राच्या तारखा बरोबर लावतां आल्या नाहींत.

९ (ॡ) सिलिमकर :—या पराक्रमी घराण्यांतील ४ पुरुषांचा उल्लेख कागदांत आहे. नं. ४५ च्या मावळ प्रांतातील कर्जदारांच्या यादींत प्रतापराव, काशीराव व बहिरजी यांचीं नांवें आहेत. नं. ५० च्या रामचंद्र गोपाळ करकरे यांच्या पत्रांत प्रतापरावाकडील पैसे वसूल झाल्याचा उल्लेख आहे नं. ६४ च्या पत्रामध्यें प्रतापजी हैबतराव देशमुख सिलिमकर याजकडील पैशाबद्दल मजकूर आहे त्याचा मुलगा कानोजी लष्करांत गेल्यामुळें त्यानें पैशाबद्दल मुदत मागून घेतली आहे. या घराण्याच्या वंशावळीला या नांवांचा उपयोग आहे. नं. ६५ मध्यें रु. ५० अकलमहमदाजवळ देऊन बाकीच्या रु. १५० बद्दल मुदत मागितली आहे. हें घराणें अजून देशमुखी वतन भोर संस्थानांतील राजगड तालुक्यांत उपभोगीत आहे.

९ (ए) **निंबाजी वायेसे** :—**वैद्या**कडून येणे पैशापैकीं कोणाकोणास व कशाकरतां पैसे द्यावे, हे नं. ८१ ते ८४ च्या कागदांत **वैद्यांना** त्यानें लिहिलें आहे. या पत्रांतून बरेच अपरिचित शब्द आले आहेत. नं. ४१ च्या हिशोबावरून याची **आपाजी सोमवंशी** सरलस्कर, यांजपाशीं मोठी देवघेव होती, असें दिसतें.

९ (ऐ) **गोसावी** :—नं. ६ च्या **राणोजी भोसल्याच्या** हिशोबांत **प्राचि'तगीर, मलगीर, हरिपन्नगीर, रामपुरी,** व **निर्मलगीर** यांचीं नांवें आलीं आहेत. नं. ३८ व ४२ मध्यें निर्मलगीर व गोवर्धनजती यांचीं नांवें आहेत. यांच्यांबद्दल माहिती **पावत्या** व **पंतसचिव** या सदराखालीं दिली आहे.

९ (ओ) **राघोबा ना। दरवे** :—२ पत्रांत याचा उल्लेख आहे. हा **नांदिवड्याचा** राहेवासी असून **वैद्याच्या** घराण्यापैकीं होता. हा वरचेवर व्यापारासाठीं **वैद्यां**कडून कर्ज काढून नेत असे (नं. ११). पैसे ठरल्याप्रमाणें वेळेवर देतां येत नसत म्हणून मुदत मागतो व मला आपला ४ था भाऊ समजा म्हणतो. **देऊडच्या डालेश्वराचे** देवालयास व **गद्रे लावगनच्या आदित्येश्वर** देवालयास बांधकामासाठीं कामगारांना कर्जापैकीं कांहीं रक्कम यानेकडून देवविली आहे.

९ (औ) **शंकराजी कान्हो** :—नं.७९ मध्यें यानें **वऱ्हाडांतील** व **नागपुरा**कडील वसुलाची सविस्तर हकीगत दिली आहे. यावरून **वैद्याच्या** देवघेवीचा व्यवहार कोठपर्यंत पसरला होता याची कल्पना होते. नं. ३८ मधील **निर्मलगिरी**ची पावती· **कानोच्या** हातची आहे. हा **वैद्यांचा** फार दिवसांचा विश्वासूक नोकर होता.

९ (अं) **कोनेरराम कोलटकर** :—यांनीं नं. ५४ व ८७ हीं पत्रें **कर्नाटकांतून** लिहिलीं असून तीं एकाच मजकुराचीं आहेत. **वराडचा** मामला मक्त्यानें घ्यावयाचा होता. त्याची रसद भरणेचें काम त्यांनीं **वैद्याकडे** सोपविलें होते. तें त्यांनीं पैसे काढून भरले असल्यास पैशाचा उलगडा लवकर व्हावा म्हणून **कोलटकरांनीं मल्हारपंतास** कांहीं रक्कम देऊन पाठविलें होतें. हे **मल्हार दादोबा बर्वे** असावे बर्वे यांनीं **वैद्यांचें** कांहीं देणें होतें तें फेडण्याची **कोनेरपंतानीं** हमी घेतली होती. ते २।३ महिन्यांनीं इकडे येणार होते. हा **वऱ्हाडचा** मामला मिळाल्याबद्दलचा कागद **बाळंभटा**जवळ ठेवण्यास सांगण्याचें कारण ते बहुधा **वाई सातारा** सोडून जात नसत. **कोनेरराम** यास **कर्नाटकां**-तून वऱ्हाडांत जाण्यापूर्वीं **वाई साताऱ्यास** जाणें भागच होते. **राणोजी**चा मामला १७४० सालीं **वैद्य** व **रत्नाकर विठ्ठल** यांनीं मक्त्यानें केलेला होता.

९ (अः) इतर कारकून वगैरेः—नं. ८८, ८९, ९० चीं पत्रें विशेष महत्वाच्या मजकुराचीं नाहींत. तथापि त्यांचे लेखक अनुक्रमें **विसोबा ना। सहस्त्रबुद्धे, शिवाजी नारायण भाव्ये** व **कासी काकाजी बरडे** असून यांचा वैद्यांशीं देवघेवीचा व्यवहार फार दिवस होता, असें खतावणींतील नोंदीवरून दिसून येतें. भाव्यांचा **सचिवा**कडे देवघेवीचा व्यवहार फार होता. **गोविंद सामराज** यास **ग्वालेर नरवर** मामलत मिळवून देण्यास यांची मदत होती. वैद्यांनीं रसदेचे पैसे दिल्याबद्दल त्यांचीं पत्रें आहेत. **कासी काकाजी बरडे** यांचें नांव १७४१।४२ व १७५०।५१ च्या खातेवहींत आहे. **सहस्त्रबुद्धे** यांचेंही नांव खतावणींत आहे. एका खतावणींत **बरडे** यास **रहिमतपूरकर** म्हटले आहे. हें कुटुंब अजूनही तेथें असेल.

---

# इतिहासप्रसिद्ध लावगनकर वैद्य घराण्याची दुरुस्त वंशावळ

१ **रामभट**

२ **तानभट** — गोविंदभट — कृष्णंभट — नारायणभट

३ **रघुनाथभट**

जन्म

मृत्यु पौष वद्य ११।१६६४
( जाने. १०।१७४३ ) सोमवार; वाईस

× सौ. जानकी
मृत्यु–पौष शु. १।१६६४
(डि. १७।१७४२) शुक्रवार

४ **भास्करभट**

जन्म

मृत्यु { चै. शु. २।१६६१
३०।३।१७३९ वाईस }

× { १ लक्ष्मीबाई ऊ. जाईबाई
( अनंतभट दामले )
२ सखूबाई ( करमकर ) }

नक्कल

४ **बाळंभट**

जन्म

मृत्यु { श्रावण शु. १४।१६७५
आगस्ट ९।१७५३
रविवार } शिवापुरास

× सरस्वतीबाई ऊर्फ गंगाबाई ( जोग )
मृत्यु १।६।१७९९ काशीस

५ **भिकंभट**

जन्म { कार्तिक शु. २।१६६०
२।११।१७३८ }

मृत्यु { चैत्र व. ४।१६८१
१६।४।१७५९ }

× गोपिकाबाई ( राजवाडे )
मृत्यु { आषाढ शु. ३।१६९७
३०।६।१७७५ }

नक्कल

---

× या चिन्हापुढील नांव बायकोचें आहे.



शिरं भट ( तांदुळवाडीकर )
बहिरंभट उ. भैरव
बाळंभट
विश्वनाथभट
यांचा वंश १२ व्या पानावर आहे.
केसो उर्फ केशव
मृत्यु पौष. शु. १२।१७०५ जाने. ४।१७८४
बापूभटबोवा
भोरभट
हे छत्रपतींचे राजवैद्य होते.
रामभट
जन्म ज्ये शु. ३।१६६४ मे २५।१७४२
मृत्यु पौ. शु. ३।१६९० जा. १०।१७६९ वाईस
× जानकीबाई ( आठवले )
कृष्णराव यांचा वंश १४ व्या पानावर आहे.
भास्करभटबोवा दत्तक घेतला.
भास्करभट दत्तक गेला. बापूभटास
भास्करराव उर्फ बापू ( संन्यासी )
जन्म स. १७६१
मृत्यु फा. शु. २।१७४९ १७।२।१८२८ अरुणाचल पर्वती
× सावित्री ( यशोदा )
यांचा पुढील वंश पान १२ वर आहे.

६ **भास्करराव**

७ **चिंतामण उर्फ दाजी** — रामचंद्र — वामन — वहिणाबाई × अभ्यंकर

रामचंद्र: मृत्यु { वै. शु. ११।१७१६ मे १०।१७९४

वामन: अल्पवयी

वहिणाबाई: लग्न { फाल्गुन व. ५।१७०९ मार्च २६।१७८८

चिंतामण उर्फ दाजी:
जन्म | स १७८९
मृत्यु { मार्गशीर्ष शु. ८।१७५९ नो. ५।१८३७ } वाईस
× | जानकीबाई ( कानिटकर )

८ अन्नपूर्णाबाई ( सरंजामे ) × जगन्नाथ प्रभाकर

९ श्रीधर

१० जगन्नाथ

११ * रामचंद्र ( हयात ) बडोद्यास

---

४ **विश्वनाथ रघुनाथ**

जन्म

मृत्यु { आ. व. ५।१६८२ ऑगस्ट ३१।१७६० } वाईस.

× उमाबाई ( माखजनचे पटवर्धन )
मृ. वै. शु. ७।१७१४, मे १३।१७९२ काशीस

५ **बाबूराव** ( संन्यासी )
जन्म { मार्ग. शु. १३।१६६७ नो. २९।१७४५ }
मृत्यु { आश्विन शु. १४।१७१७ ऑक्टो. २७।१७९५ } टोक्यास
× { १ अन्नपूर्णा ( साठे ). २ रमाबाई उर्फ आक्काबाई ( जोग ) }
मृत्यु वै. शु. १२।१७६०, मे ६।१८३८ वाईस.

५ **काशिराव ऊर्फ काशिनाथ**
जन्म { मार्ग. व. ७।१६७९ जा. १।१७५८ }
मृत्यु { चै. शु. २।१७१३ एप्रिल ५।१७९१ }
× भागीरथी ( सती )
नक्कल

६ **नारायणराव उर्फ दादासाहेब** ( संन्यासी )
जन्म { पौष व. १३।१६९० फे. ४।१७६९ }
मृत्यु { भाद्र. व. १३।१७५० आगस्ट ६।१८२८ वाईस }
× लक्ष्मीबाई उ. काशीबाई ( रास्ते )
मृत्यु का. व. १०।१७५५, डि. ६।१८३३

६ **माधवराव**
जन्म
मृत्यु { फा. १७१४ फे. १७९३ } कोकणांत
× राधाबाई मृ. { श. १७२२ स. १८०० }
नक्कल

आनंदराव यांचा वंश १३ व्या पानावर आहे.

७ मुलगी चि. धोंडूबाई × सासवडच्या भाव्याकडे
लग्न फा. १७२१, मार्च १८००
नक्कल

* हयात व्यक्तींचें हें चिन्ह आहे.

५ बाबूराव

६ आनंद बाबूराव ( संन्यासी )

जन्म

मृत्यु माघ व. ८।१७७३ / १३।१।१८५२ } काशीस

× १ साळूबाई ( गणेशभट शारंगपाणी )

मृत्यु { आश्विन व. १४।१७४६ / जाने. २१।१८२४

२ उमाबाई उ. काकूबाई ( जोग )

मृत्यु { मार्ग. व. १।१७९६ / डिसें. २४।१८७४

७ सखाराम दत्तक पहिला (गणेश दिवाकराचा मुलगा) (जमखिंडी) दत्तविधान १३।१२।२६

मृत्यु { चै. व. १३।१७५८ / एप्रिल १३।१८३६ जमखिंडीस

× बयाबाई ( दाभोळकर )

मृत्यु { वै. शु. १०।१७५९ / १५।५।१८३७

नक्कल

माधवराव उ. तात्यासो (संन्यासी) दत्तक दुसरा (लावगनचे परशुराम विश्वनाथाचा मुलगा) दत्तविधान, ९।११।१८३७

जन्म सन १८२२

मृत्यु { का. शु. ५।१७९७ / नोव्हेंबर ३।१८७५ } वाईस

× रमाबाई ( आपटे लिंबचे )

रामकृष्ण माधवराव उर्फ नानासो

जन्म { आश्विन व. ८।१७६७ / आक्टो. २३।१८४५

मृत्यु { फा. शु. २।१८४६ / मार्च ८।१९२४ } पुण्यास

× लक्ष्मीबाई ( विनायकराव भानू ) वाई

मृ. १९२५

लक्ष्मण उर्फ अण्णासो

जन्म { आषाढ व. १०।१७७२ / ऑगष्ट ३।१८५०

मृत्यु { माघ व. ४।१८४८ / फेब्रु. १२।१९२७ } वाईस

× राधाबाई ऊ. यमू (घारपुरे)

मृत्यु भाद्र. व. ७।१७६२

९ गणेश अनंत दत्तात्रय* वासुदेव शंकर *

विनायक शंकर उर्फ बाबूराव वैद्य

५ कृष्णराव उर्फ तात्या ( संन्यासी )

जन्म | मार्ग. व. १४।१६७२ / डि. १६।१७५० } रविवार

मृत्यु | का. शु. ३।१७४९ / ऑक्टोबर २३।१८२७ } काशीस

× | रखमाबाई ( रुक्मिणीबाई ) उर्फ ताई ( रामाजी अनंत दाभोळकर ) } ( सती ) काशीस

६ रघुनाथराव उर्फ दादा

जन्म | मार्गशीर्ष वद्य ८।१६९२ / डिसेंबर १०।१७७० }

मृत्यु | माघ वद्य ११।१७१८ / फेब्रुवारी २२।१७९७ } नांदिवड्यास

× | आनंदीबाई ( परशुरामभाऊ पटवर्धन ) उर्फ मैनाक्का ( सती )

यमुना
× नारायणराव मेहंदळकर ऊर्फ. जोशी
मृ. १८२९

७ विश्वासराव उर्फ बाबा

जन्म | मार्ग. व. ४।१७१३ / डिसेंबर १४।१७९१ } तासगांवीं

मृत्यु | मार्ग. व. ८।१७४७ / जानेवारी १।१८२६ } तासगांवीं

× | गंगाबाई उर्फ व्यंकूबाई ( रामचंद्र गोपाळ कोल्हटकर पांडेवाडी )

८ व्यंकटराव उर्फ बापूसाहेब

जन्म | फा. शु. १।१७४५

मृत्यु | जे. व. १३।१८०२

× | लक्ष्मीबाई उ. सखू ( राघो सदाशिव थत्ते )

सखूबाई ऊर्फ गंगू
× गंगाधर माधव रास्ते
जन्म { फा. व. १२।१८३७ / मार्च १३।१८१७

९ रघुनाथ उर्फ दादा

जन्म | १।१०।१८५१

× | सीताबाई ( बळवंतराव फडके हरिपूर ) मृ. १२।१२।१९३७

१० व्यंकटराव रघुनाथ

जन्म |

मृत्यु | १६।९।१९०३

× | लक्ष्मीबाई (दात्ये—इचलकरंजी) मृत्यु मे. ४।१९३५

* सीताबाई ( लक्ष्मी )
× माधवराव जोशी

११ *विनायक उ. भाऊ सो दत्तक आला. लक्ष्मीबाईचा भाऊ ४।२।१९२० रोजीं

जन्म | ९।१।१९०६

× | चंद्रावती ( विष्णु रामचंद्र वेलणकर सांगली )

१२ *श्यामसुंदर जन्म नोव्हेंबर २।१९४३

# वैद्यांच्या वंशावळींतील ऐतिहासिक पुरुषांबद्दल पुरवणी माहिती.

पूर्वीच्या दोन खंडांत ऐतिहासिक पुरुषांबद्दल दिलेल्या माहितींत झालेल्या चुका दुरुस्त करून जास्त मिळविलेली माहिती देत आहे.

१ रघुनाथ भट (३) यांची आणखी दोन पत्रें ज्ये. शु. ३ । १६६२ चीं सांपडलीं आहेत. त्यावरून लागवनचें लक्ष्मीनारायणाचें व जयगडच्या कऱ्हाटेश्वराचें देवालय ही बांधण्याचें काम त्यांचेंच देखरेखीखालीं चाललें होतें असें दिसतें. त्यांचे बंधू बहिरंभट ऊर्फ भैरव यांचे दोन मुलगे बाबदेव व केशव ऊ. केसो यांचीं दप्तरांत पुष्कळ पत्रें आहेत. यांनीं हजारो रुपयांचे देवघेवीचे व्यवहार केले होते. यांचें घर पुण्यास शनवारांत नव्यापुलाजवळ नदीकाठीं असावें. बहिरंभटाचा वंशविस्तार फार मोठा आहे. त्याच्या दहाव्या पिढींतील कुटुंबें अजून पुण्यांत आहेत. त्या वैद्यांपैकींच एकानें खरेदी घेतलेलें घर पुणें पांजरपोळाच्या बोळांत असून तें कन्यावारसामुळें नागपूरच्या रा. बळवंतराव गोखले नांवाच्या वकीलाकडे गेलें आहे. हे आपल्या स्त्रीसुद्धां पुण्यांत या घरांत राहतात.

२ भास्करभट (४). यांची स्त्री लक्ष्मीबाई नांदिवडयाच्या अनंतभट दामल्यांची मुलगी होती. दुसरी स्त्री सखूबाई ४-१०-१७४१ मध्यें काशीस गेली होती. ती १७४२ मध्यें परत आल्यावर मावंदें केल्याचें हिशेब आहेत. तिची बहीण बापटांकडे दिली होती, असें पौष शुद्ध ७ । १६६२ च्या खर्चावरून दिसतें. तिला ४ रुपये दिल्याचा उल्लेख त्यांत आहे. त्यांची बहीण जिऊबाई बुरुंबाडचे बाळजोशी यांना दिली होती.

भास्करभट यास मिळालेल्या सनदांचें टिपण खंड १ पान ८ मध्यें दिलेलें दुरुस्त करून, खालीं देत आहे.

| | |
|---|---|
| १ मौजे कासारी बिघे ३ बा<br>२ मौजे लावगन वैद्य बिघे २ बा<br>३ मौजे वाटद बिघे ५ बा<br>४ मौजे रीळ बिघे ५ बा<br>एकूण १५ | इनामपत्र १७-११-१७२६<br>मार्ग. शु. ५ । १६४८ |
| ५ मौजे नरवण बिघे १० बा<br>६ मौजे लावगन वैद्य बिघे १० बा | ११-१-१७२८<br>माघ शुद्ध ११ । १६४९ |
| ७ मौजे सांडे लावगन बिघे २ बा | ९-८-१७२८<br>श्रा. व. १ । १६५० |
| ८ मौजे नांदिवडे बिघे ४ बा | २७-९-३२<br>आश्वीन वद्य ५ । १६५४ |
| ९ मौजे जांभळी व महुरी सं. भोर दरोबस्त हरदू गांव | ७-९-१७३३<br>भाद्रपद शुद्ध १० । १६५५ |

३ बाळंभट (४). पुरवणी खंडामध्यें त्यांच्या स्त्रियांबद्दल दिलेलीं माहिती चुकीची आहे. त्यास एकच स्त्री सरस्वतीबाई होती. गंगाबाई हे तिचें माहेरचें नांव होतें तिचा [illegible]

विश्वनाथ जोग यांस बापूजी नांवाचा मुलगा होता. ही काशीयात्रेस शके १७१४ मध्यें गेली होती. तेथेंच ती २१-६-१७९६ रोजीं वारली. मुलगा कृष्णराव (५) यांस तिचीं तेथून आलेलीं पत्रें वाचण्यालायक आहेत. भिकंभट, रामभट व कृष्णराव हे तिघे मुलगे व अनुबाई एक मुलगी अशीं चार अपत्यें तिला होतीं. अनुबाईचें लग्न गंगाराम रास्त्याबरोबर फा. शु. ४। १६७२ (फे. १८। १७५१) रोजीं झालें. तिला व्यंकटराव नांवाचा मुलगा होता.

४ विश्वनाथ भट (४). यांना ऊर्फ बापू म्हटल्याचें शाहू महाराजांचे १७४८ च्या पत्रांत आहे. यांस नागपुरास वरचेवर स्वारीस जावे लागे. त्यांच्या हिशेबाच्या कागदांत मुक्काम दिले आहेत. यावरून त्यांचा जाण्याचा मार्ग व हालचाली यांची माहिती होणार आहे.

५ भिकंभट (५). यांचा जन्म का. शु. २। १६६० नोव्हें. २।१७३८. रोजीं झाला. यास पायांतील जोडा घेतल्याचें हरबाजीनाईकाच्या हिशोबांत आहे. बायको गोपिकाबाई इच्या वडिलांचें नांव धोंडोपंत राजवाडे होतें. ही सदाशिव रघुनाथ यांची मुलगी नसून पुतणी होती. यांची मुंज वैशाख शुद्ध १०। १६६८, १९-४-१९४६ रोजीं झाली. त्यावेळीं अहेर झाले, त्यांची यादी दफ्तरांत आहे. यांचें लग्न फा. १६६९ सन १७४८ मध्यें झालें. याच सालीं याच महिन्यांत रामभटांची मुंज झाली.

६ रामभट ऊर्फ नाना (५). पाडळीच्या आठवल्याकडे यांची सामुरवाडी होती. यांच्यापैकीं एक आठवले सध्यां साताऱ्यास वकील आहेत. त्यांचेकडे जुनें दप्तर असेल. त्यांत वैद्यांचीं पत्रें पुष्कळ सांपडण्याचा संभव आहे.

७ बाबूराव विश्वनाथ (५) याबद्दल जास्त माहिती नाहीं.

८ काशीराव (५). बाबूरावांचा धाकटा भाऊ होता. याची विस्तृत जन्मपत्रिका आहे. याच्या जन्म मृत्यूची तारीख व बायकोचें नांव हीं वंशावळींत दिलीं आहेत. याची मुंज माघ वद्य ५।१६८७ मध्यें झाली. लग्न शके १८९० मध्यें झालें असावें. हा बाबूराव १७५७-५८ मध्यें काशीस गेले असतां जन्मास आला म्हणून याचें नांव काशीराव असें ठेवलें. याचीं मामुली मजकुराचीं पत्रें दफ्तरांत आहेत.

९ कृष्णराव तात्या (५). यांची विस्तृत जन्मपत्रिका आहे. पहिली मुलगी मैनाबाई इचा लग्नखर्च रु. ५९२६। =॥ झाला. बयाबाई व सगावाई या जुळ्या मुली होत्या. त्यांची जन्मतीथ अनुक्रमें पौष व. १। १६९७, ६-१-१७७६ व पौष व. २ १६९७, ७-१-१७७६ निघते. यांपैकीं वडील सगाबाई धरावयास पाहिजे. कारण ती बयाबाई जन्मास आल्यावर झाली. बयाबाई परचुरे कार्तिक व. १७०७ मध्यें वारली. काशीबाई साठे यांची जन्मतीथ श्रा. व. १३ श.१७०२, २८-८-१७८० होती. वेणूबाई ज्येष्ठ व. १८।१७२७, २६-६-१८०५ रोजीं वारली.

१० भास्करराव रामचंद्र (६) यांची सरस्वतीबाई सावत्र आजी नसून सख्खी होती. यास बहिणाबाई नांवाची मुलगी होती. बहिणाबाईला गोविंदराव अभ्यंकर यांचे मुलांस वर योजून, लग्न फा. व. ५ शके १७०९ रोजीं झालें. बहिणाबाईला चिरंजीव म्हटले आहे, त्यावरून ती भास्कररावापेक्षां लहान असावी. यांचा जन्म श. १६९०, सन १७६८ मध्यें, मुंज माघ शके, १६९६, सन १७७५ व लग्न शके १७००, सन १७७९ मध्यें झालें असावें.

# पुरस्कार—१७४१

वैद्य-दप्तरांतील कागदांचा तिसरा खंड प्रसिद्ध होत आहे, हें पाहून फार संतोष वाटतो. जुने ऐतिहासिक कागद शोधणें, निवडणें, वाचणें, नकलणें, आणि त्यांची मिति व संदर्भ ठरवणें, इत्यादि कामें किती किचकट आहेत हें ज्यांना ह्या कामाचा प्रत्यक्ष अनुभव असेल तेच जाणूं शकतील. इतकें जिकिरीचें हें काम भारत इतिहास संशोधक मंडळाचे वयोवृद्ध सभासद श्री. शंकर लक्ष्मण वैद्य यांनीं वयाची पंचाहत्तरी उलटून गेली असतांही इतक्या चिकाटीनें चालविलेलें पाहून मोठा विस्मय वाटतो. या खंडांत सन १७४१ मधील ८८ कागद मितीवार प्रसिद्ध झाले असून, प्रत्येक कागदाखालीं त्यांत कोणता विषय आहे त्याचें इंग्रजीमध्यें संक्षिप्तपणें दिग्दर्शन केलें आहे. तसेंच प्रस्तावनेंत सर्व कागदांचा साकल्यानें परामर्श घेतला असून शेवटीं विस्तृत सूचि जोडलेली आहे. यामुळें वाचकांची मोठी सोय झालेली आहे. या खंडांतील अनेक पत्रें अनेक दृष्टींनीं महत्त्वाचीं आहेत. क्रमांक २९ चें निळो रघुनाथ यानें वैद्य बंधूंस लिहिलेलें पत्र ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें विशेष उल्लेखनीय आहे. मराठ्यांच्याच नव्हे तर हिंदुस्थानच्या इतिहासांतील सन १७४१ मधील सर्वांत मोठी राजकीय घटना म्हणजे मराठ्यांची दक्षिणेंतील स्वारी व तींत त्यांनीं त्रिचनापल्ली सर करून चंदाखानास कैद करून आणणें ही होय असें म्हणतां येईल. या घटनेचें सविस्तर वर्णन तेथें प्रत्यक्ष असलेल्या गृहस्थानें केलेलें असें हें ह्या पत्रानेंच प्रथम प्रसिद्ध होत असल्यानें या पत्राचें विशेष महत्त्व आहे. या मोहिमेवर रघूजी भोसले व फत्तेसिंग भोसले हे दोघे स्वतंत्रपणें अधिकार चालविणारे सरदार गेले होते. सर्व सैन्यावर एकमुखी सत्ता नसली, त्यांत बहुनायकी असली तर प्रसंगीं मतभेद, परस्परांचे हेतूविषयीं गैरसमज, दिरंगाई, चुकारपणा, क्वचित् कार्यसिद्धींत विघ्न आणि कार्य सिद्ध झालें तरी त्याची फलप्राप्ति यथोचित न होणें, असले प्रकार होण्याचा कसा संभव असतो, याची चुणूक या पत्रांतही दिसून येते. दक्षिणेंत मराठी राज्याचा विस्तार होण्यास तिकडे मराठ्यांचें कायमचें ठाणें होणें असून त्याची राजधानी करण्याजोगें त्रिचनापल्ली हें अत्युत्तम ठिकाण आहे, याची जाणीव मराठे सरदारांस झालेली नसली तरी निळो रघुनाथासारख्या कित्येकांस झालेली होती, असें म्हणण्यास या पत्रांत जागा आहे. साबाजीला दक्षिणेंत बोलावून त्याची स्थापना त्रिचनापल्लीस करून तेथें नागपूरकर भोसल्यांची शाखा स्थापन करावी, असा विचार रघूजीच्या मनांत आला होता, असें अनुमान या पत्राच्या आधारें कोणीं काढिल्यास तें युक्त होणार नाहीं. तशा प्रकारच्या हेतूचा आरोप रघूजीच्या प्रतिपक्ष्यांकडून घेतला जात होता, पण तो निर्मूल होता असें लिहिण्याचा निळो रघुनाथाचा आशय आहे, हें ह्या पत्राकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास दिसून येईल असें आम्हांस वाटतें. त्रिचनापल्ली रघूजीनें सर केली असतांही त्यानें तेथें फत्तेसिंगाचीं निशाणें चढवून ती त्याचेच हवालीं केली यावरून शाहूमहाराजांचे आज्ञेबाहेर आक्रमण न करण्याचा रघूजीचा मनोदय स्पष्ट होतो. त्याच्या ह्या कृत्यानें लाभ न होतां हानि होण्याची भीति आहे, असें निळो रघुनाथ दिग्दर्शित करीत आहे. शाहूमहाराजांच्या पदरीं जसे बाजीराव, चिमाजी अप्पा तसे रघूजीच्या पदरीं भास्करराम व कोन्हेरराम हे दोघे कोल्हटकर बंधु होते असें क्वचित् वर्णिलेलें आढळतें, तें तितकें यथार्थ नसलें तरी भास्करराम मोठा धडाडीचा वीर पुरुष होता यांत शंका नाहीं. रघूजीचें वर्चस्व कटक, ओरिसा, बंगाल ह्या प्रांतांत बसविण्याचें बरेंचसें श्रेय भास्कररामाच्या पराक्रमासच

आहे. या त्रिचनापल्लीच्या स्वारींतही त्याच्या धडाडीचा प्रत्यय उत्तम प्रकारें आल्याचें ह्या निळो रघुनाथाच्या पत्रावरून दिसून येत आहे. रघूजीच्या सैन्यानें त्रिचनापल्लीस वेढा देऊन चंदाखानास आंत कोंडलें असतां त्याचा भाऊ बडेखान हा मोठी फौज घेऊन त्याचे मदतीस येत होता, तेव्हां मराठ्यांची फौज बाहेरून वेढली जाण्याचा संभव प्राप्त होऊन ती हवालदिल झाली असतां भास्कररामानें बडेखानावर चालून जाऊन त्याचा निःपात कसा केला आणि लगोलग त्रिचनापल्लीस परतून तेथील हल्ल्यांत पराक्रम गाजवून खुद्द चंदाखानास पकडून वऱ्हाडकडे कसा नेला, हा वृत्तांत ह्या पत्रानें नवीनच कळत आहे. या पत्राप्रमाणेंच ह्या खंडांतील भगवंतराव अमात्याचीं पत्रेंही वाचनीय आहेत. अंगीं कर्तृत्व नसतां केवळ वडिलांच्या कीर्तीवर जगण्याचा तो काळ नव्हता, हें ह्या पत्रांवरून उघड होत आहे. प्रस्तुत खंडांत जमाखर्चाचे कागद बरेच आहेत, त्यांचेंही त्यांच्या परीनें महत्त्व आहेच. त्या काळीं पैशाचे व्यवहार कशा प्रकारें होत असत हें या कागदांवरून कळून येतें. तेव्हांचे लहान-मोठे सरदार स्वारीवर जातांना सावकारांपासून कांहीं कर्जें घेण्याचे करार करीत; पण सर्व रक्कम लगेच न उचलतां ती त्या सावकारांकडे तशीच राहूं देत. पुढें वेळोवेळीं "अमक्यास अमुक रुपये द्यावे" अशा प्रकारच्या चिठ्या त्या सावकारांवर पाठवीत. बँकेवर चेक देण्यासारखाच हा व्यवहार त्या वेळीं होत असे. प्रस्तुत खंडांतील क्रमांक ८१, ८२ व ८३ हीं पत्रें म्हणजे निंबाजी वायेसे ह्या सरदारानें वैद्यांचे पेढीवर पाठविलेल्या अशा प्रकारच्या चेकवजा चिठ्याच आहेत. पान ५४ व ५५ वर सन १७०८ ते १८१८ (पेशवाईअखेर) वैद्य घराण्यांतील पुरुष हे काय काम व कोणाचे कारकीर्दींत किती वेळ करीत होते याचा तक्ता दिला आहे. सुमारें शंभर वर्षें एकनिष्ठपणें हुशार सल्लागारी कामगिरी करणारें कुटुंब क्वचित् सांपडेल. राज्यनिष्ठेमुळें सर्वस्व गेलें तरी पर्वा केली नाहीं. असो. श्री. शंकरराव वैद्य यांनीं चालविलेलें वैद्य घराण्यांतील निवडक ऐतिहासिक कागद प्रकाशित करण्याचें कार्य सिद्धीस नेण्यास त्यांस उदंड आयुरारोग्य लाभो, अशी प्रार्थना करून हे परिचयात्मक चार शब्द पुरे करतों.

स्वातंत्र्यदिन :
१५-८-४८

**चिं. ग. कर्वे,**
चिटणीस, भा. इ. सं. मंडळ, पुणें

No. 1 श्री शके १६६३
सन १६४१

सकल वेदशास्त्रसंपन्न वेदमूर्ति राजश्रियाविराजित

राजमान्ये राजश्री **बालंभट** व रो **विश्वनाथभट** स्वामीचे सेवेसी.

सेवक **नरसिंगराऊ**: कृतानेक सां नमस्कार विनंति. उपरी येथील कुशल जाणून स्वामींनीं आपलें स्वकीय कुशललेखन करीत गेलें पाहिजे. विशेष तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान सविस्तर अवगत जाहालें. त्यास आम्हीं **सातारियास** यैवज केला होता. त्यास आम्ही सातारियास आलों होतों त्यास यैवज आला नाहीं आणि आम्हांस शुलाची वेथा बहुत आहे, त्याणें फार जेर केलें. त्याकरितां निघोन आलों. त्यास इतके दिवस स्वामींनीं कृपा केली, तैसी श्रीमंत महाराज राजेश्री **शरीफजीराजे** आलिया उपरी आपले रुो वारून देऊं. कांहीं चिंता न करणें. हरघडी मनुष्यें न पाठवणें. माणसास रुा १ येक पावता केला. बहुत काय लिहिणें हे विनंति. **संताजी जाधव** मुखजबानी सागतां कलो येईल.

Narsingrao (probabably Jagathap) writes to Vaidya Brothers that their money will be paid on arrival of Shareefji Raje, as the money promised to me at Satara was not obtained.

---

No. 2 श्री नक्कल श. १६६३
स. १७४१

दाा बो मोकदम मोजे **बऱ्हाणपूर** पाा **सुपे** सुा हजार ११५१ कारणे सेवेसी कबूलकतबा लेहून दिल्हा यैसाजे. साहेबी हुजूर बोलाऊन सालगुदस्तां मोकासबाब व निमचोथाईचा जमा मुसकस[1] करणें. त्यास गांवचा हालहवाल तरी, हंगामसीर पावसानें कमी केलियामुळें पीक जुजवी जालें, रयेतीमध्यें कांहीं ताकत राहिली नाहीं. जीवन पाहोन जमा सिरीं ठेविली पाा. गुदस्ताची उगवणी व सालमजकुरची लावणी करूं. येचाबे देशमुख व देशपांडे राा मजकूर यांणीं आर्ज केला तो खातरेस आणून खरीफ, रबी, जिराईत बागाईत माल व सायेर कुलबाब कुलकानू काली, पांढरी, सालतयामधील मक्ताजमा सिरीं ठेविली तें कबूल असो. यांची उगवणी व सालमजकूरची लावणी करून. जमा याो रुये[3].

८३ यैन मुकासबाब
१०। निमचौथाई

थाो सवा ब्याण्णव रुपये रास ९३।

दाा **खंडोजी उमाजी कुलकर्णी**, मोजे मजकूर निा नागर.
दस्तक[2] **नारो केशव देशपांडे** पाा मार
दाा **राघो बाबुराव देशपांडे** पाा मार
दाा **निळो देशपांडे** पाा मार
सिका दाा **देशमूख काटे** पाा मार

This is a Kabulayat given by Mokadum of Barhanpur just after the Sanad of the village was granted by Appaji Somavansi to Vaidya Brothers. The Sanad was granted on 1-10-1740.

---

१ निश्चित, मुकरर. २ साक्ष. ३ रुपये.

No. 3 श्री+रामचंद्र पौष १६६२
जानेवारी १७४१

सकलगुणपरिपूर्ण राजमान्य राजश्री **बाळंभट व राजश्री विश्वनाथभट वैद्य**
स्वामी गोसावी यासि.

पोष्य **भगवंतराऊ रामचंद्र** कृतानेक नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशललेखन केलें पाहिजे विशेष. **माहाराजाकडे** व तुम्हांकडेस रा **संभाजी पडवळ** व रा **सिवाजी मल्हार** पाठविले आहेत व संक्रमणप्रयुक्ततीळशर्करा पाठविली आहे. महाराजांस विदित करावें व तुम्हीही घ्यावी. यानंतर मौजे **तांदली** ता कर्डे-**राजणगाऊ** येथील खंडणी राजश्री **सचीवपंता**कडील आजि दोन वर्षे तटली आहे, याकरितां तेथून आम्हांस पत्रें आली आहेत. याकरितां उभयता मानिले पा आहेत. तरी तुम्ही **सचीवपंतास** व रा **सिवजो नारायेण** यांसि सांगोन गावचें जीवन माफिक खंडणी करऊन मौजे मजकुरास कौल देविला पाहिजे, येविसी अंतर सहसा न करणें. सविस्तर अर्थ मानिले सांगता कळेल. +कृपा करावी. माहाराजांचे सेवेसी विनंतीपत्रें आर्जी पाठविली आहे. आक्षरशा विदित करून आमचें उर्जित होये, सारथ्य होये तो अर्थ करावा. सत्यवचन इमान जतन करावें. हें घर आपलें आहे. इरे धरावी, अभिमान धरावा. **माहाराजा**जवळी विनंती करणें. सर्वांस राज्यांत जागा आहे. सरंजाम पोटीस मिळते, आण आम्ही काय केलें आहे ? दरबारीं दाद नव्हे. मनसुबी नाहीं हें पुसावें. उतलों माजलों नाहीं. माहाराजांचे पायीं येकनिष्ठ आहों. ब्राह्मण सेवक कदीम आहों. दया करणे हे विनंतीपरहुजुर+

Bhagwantrao Amatya writes to Vaidya Brothers that they should do something to remove the difficulty of obtaining the revenue of Tanadali in the territory of Sachiv. Shiwaji Narayan Bhave will be useful in this respect. The Chhatrapati did not pay attention to his grievances. The Sanad of Tandali was granted to Amatya Brothers on 29-11-1738 for the Kulkarni and Jyotish Vatans.

---

× फुलीपुढील मजकूर स्वदस्तुरचें अक्षर.

---

No. 4 श्री+रामचंद्र पौष १६६२
जानेवारी १७४१

पुरवणी राजश्री **बाळंभट** व राजश्री **विस्वनाथभट वैद्य**
स्वामी गोसावी यासि.

विनंती. उपरी गतवर्षी **चिरंजीव महाराजांचे** सेवेसी राजदर्शनास पाठविलें. खर्चास नाहीं. नातवानी बहुत पाहून आपणास कर्जाविसी संकट घातले, तेव्हां आपण रुपये ४०० व्यारसे कर्ज काढून दिलें. त्यास येक वर्ष जाहालें. सवाईप्रमाणें व्याजासुधां

पांचसे रुपये जाहाले. यैवज पाठवावा, त्यास आमचा ओढीचा प्रसंग. नातवानी बहुत आहे. पदरीं खर्च बहुत लागला आहे. सरदारी आहे. कोंकणांत राजश्री **संभाजी आंगरे** यांचा हर्षामर्ष व वरघाटे **कोलापुरचा** शह लागला. यामुळें फार दिवस लागले. स्वामीस तों कोप आलाच असेल. इलाज तो कांहीं नाहीं. हाली कांहीं मनसबाकार्य उपस्तित जाहालें आहे. टका पैका कर्जवाम पाहिजे. या प्रांतें तो कोण्ही सावकार मिळत नाहीं. आम्हांस तो जरूर. कार्याचें संकट पडिलें आहे. याजस्तव हें पत्र लिहून राजश्री **सिवाजी मल्हार** पाठविले आहेत. हे सांगतील तो अर्थ चित्तांत आणून येसमई कर्जाचें साहित्य केलें पाहिजे. व्याजसुधां तुमचे पैके आर्धी पावते करून देऊं. +समये रक्षील तो सखा, मैत्र आहे. हा समय पुढें येत नाहीं. स्वामीस संकट घातलें आहे. येसमई साहित्य करून कार्य संपादावें. मग माणसें ठेऊन आपलें कर्ज व्याजसुदां वारून आर्धी घ्यावें. आमची विनंती चालवावी. दया करावी. हे विनंतीपर हुजुर+.

Bhagwantrao Amatya writes to Vaidya Brothers that he is in need of money. They paid him Rs. 400 last year with his son who paid a visit to Shahu. He was troubled by Angre in Konkan and above the ghat by the Raja of Kolhapur.

---

× फुलीपुढील मजकूर स्वदस्तुरचा आहे.

---

No. 5 श्री माघ शु. १।१६६२
जानेवारी ७,१७४१

राजाश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बालंभटबावा वैद्य** स्वामीचे सेवेसी.

पो **गोविंद सामराज** कृतानेक सां नमस्कार विनंति. येथील कुशल जाणून स्वकीयें कुशललेखन करीत गेलें पाहिजे. विशेष, स्वामीकडून रुये ११८८ अकरासे अठ्याइसी रुो राजश्री **त्र्यंबक कानो** यासी देविले होते. माघ सुध १ प्रतीपदे ××× तही आपणाकडे पाठ ××× पूर्वी लेहून पाठविलें ×××× पत्र लिहिणें. रुये दे ××× राजश्री विश्वनाथबावांनीं सांगितलें त्यावरून लिहिलें आहे, तर **त्र्यंबकपंतास** रुये पावऊन पावलियाचें उत्तर आम्हांस पाठवावें. लोभ असो दिला पा हे विनंति.

Govind Samaraj requests Balambhat to pey Rs. 1188 to Tryambak Kano.

---

No. 6 श्री माघ १६६२
जानेवारी १७४१

देणें नि॥ **राणोजी भोसले** मामला **वराड**पैकीं बाकी.

सुमा इहिदे आर्बैन मया अलफ.

हसा माघमासपैकीं देणें रुये १२५००

३०० छ २४ रमजान रदकर्ज **प्रचितगीर** व **मलगीर** व **हरिपत्रगीर**
पेशजीपैकीं देविलें. व्याज काढून घेतलें. सदरहु खेरीज रुो १२.

२५० **विश्वनाथ भट वद्य** छ. २४ रमजान बोलीपैकीं.

५०० छ २२ रमजान **गणोबा नाईक पैठणकर** व्याज सरकारांत द्यावें.

२००० छ १२ रमजान रद कर्ज **निर्मलगीर** व्याज काढून घ्यावें मजुरा द्यावें.

ज्येष्ठ मासपैकीं

१०० छ २४ रमजान **रामपुरी गोसावी** हस्ता पैकीं व्याज काढून घ्यावें.

२५० छ २४ रमजान **विश्वनाथ भट** बोलीपैकीं.

१००० छ. २२ रमजान **गणोबा ना** पैठणकर.

२००० छ १२ रमजान रदकर्ज **निर्मलगीर.**

रदकर्ज **विठोबा ना वाकडे गु कोनेरपंत** वरात छ. २५ रमजान रुो ३३७५

The details of instalment of money Rs. 12500 paid in Magh by Vishwanathbhat for Ranoji Bhosle as settled by the contract of 30-10-1740. This was paid out of the Revenue of Berar.

---

No. 7 श्री माघ शु. ५।१६६२
जानेवारी ११,१७४१

राजश्री **बाळकृष्ण वैद्य** गोसावी यासि.

द अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्ये. श्रो **नागोजीराऊ पाटणकर** दंडवत विनंति. उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशललेखन करीत गेलें पाहिजे. विशेष आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन कुशलार्थ कलत नाहीं, तरी येसें न करितां सदैव आलिया वार्तिकासमवेत पत्र पाठऊन चित आनंदातें पावविलें पाहिजे. यानंतरी सांप्रत रा **धारराऊ** यांणीं **कोळियाहून शिराळियास** जातेसमई मौजे **बेलवडे** प्रा मजकूर आमचा गाऊ तेथें जाऊन तळ घालोन गावांत मारामारी आटाआट केली. साठी रुपये घेतले. वाडा तेथें बाधणार. मेंढरें आणून ठेविलीं. आणिखी **सिराळियासि** राहून कितेक कजिया कथला करावयाची घमक आहे. त्यास आपण प्रसंगीं आहेत. सर्वाविसी आपणाकडे आम्ही बेफिकीर आहों. त्यास आनयासेंकरून राजेश्री **येसाजी दादा भोसले, सातारा** आले आहेत. आपण राजश्री **स्वामी** यांसि विदित करून ताकीद होऊन **धाररायाकडून** उपसर्ग गावास न होये आणि साठ रुपये घेतले आहेत ते माघारे द्यावे येसी ताकीद होये ते गोष्टी केली पाहिजे. याजउपरी आमचें इनाम पूर्वापार **नांडेढोबसे** येथें आहेत हें आपणासही दखल आहेत. त्यास आजीपरियेंत कोणी कांहीं तेथें उपसर्ग केला नाहीं. सांप्रत राजश्री **रत्नाकरपंतांनीं** वरातदारावरी। वरातदार पाठऊन धामधूम करून चालीस पनास रुपये मसाला घेऊन दोनी गाव पलविले. त्यास राजश्री **स्वामी** यांसि येद्विषई अर्ज करून **रत्नाकरपंतास** ताकीद करून मनाचिटी देविली पाहिजे. बहुत काये लिहिणें लोभ असो दीजे हे विनंति.

श्रीछत्रपति
महाराजाशाहू
चरणी तत्पर ना
गोजीराव पा
टणकर

××
मोर्त
बसुद

Nagojirao Patankar writes to Balambhat to restrain Dharrao and Ratnakar Vithal through Shahu Maharaj, as they are troubling the people of his Villages. He was a debtor of Vaidyas.

---

No. 8 श्री माघ शु. १३।१६६२
जानेवारी १८,१७४१

वेदशास्त्रसपन्न राजश्री **विश्वनाथ भट वईदय** स्वामीचे सेवेसी.

सेवक **केशव नाईक चितळे** सा नमस्कार विनंति, उपरी येथील ता माघ सुध १३ पावेतों समस्त सुखरूप असो. यानंतर तुम्हाजवळ यैवज करार केला तो राजश्री **वैजनाथ नाईक चिवटे** नि मुताली(क) पाठविले आहेत. तरी याजपासीं रुपये २००० दोन हजार आरकटी अथवा गंजीगोटी देणें. राजश्री **सदाशिव नाईक रास्ते** यांजकडील खत व कागद दिल्हा. त्यास ते बोलिले जे. आपला कारकून लष्करास गेला आहे. तो आल्यावर हिसेब पाहूं मग रुा देऊं. याकरितां खत व हिसेब कागद तुम्हाकडे पाठविला आहे. तो घेऊन पावलियाचें उत्तर पाठऊ(न) देणें. बहुत काये लिहिणें. कृपा लोभ आसो देणें हे विनंति.

Keshav Naik Chitale writes to Vishwanathbhat that he should send Rs. 2000 with Vaijanath Naik Chivate of Mutalik Sadashiv Naik Raste, the brother of Bhikaji Naik is prepared to examine the account after the return of his clerk and then pay the money.

---

No. 9 श्री माघ वा ५।१६६२
जानेवारी २५,१७४१

हिसेब रा. **नागोजीराव पाटणकर** सु॥ आर्बा आर्बैन मया आलफ ईा शके १६६२ रौद्र संवत्सरे माघ वद ५ ता शके १६६६ वैशाख सुध १ पावेतों.

५०० यैन मुदल रुपये.
१३७॥ व्याज मुा माहे १२ शके १६६३ दुर्मती सवत्सरे माघ वा ५ दर २॥ प्रमाणें रुा १५० वजा बारोत्रा रुा १२॥ बाकी.

६३७॥
१७५ किताव्याज माहे १२ ता शके १६६४ माघ वद ५ पावेतों रुा १९१। वजा १६।.

८१२॥
२२३ किताव्याज माहे १२ ता शके १६६५ माघ वद ५ पावेतों रुा २४३॥ वजा बारोत्रा रुा २०॥ बाकी.

१०३५॥
५५ किताव्याज मुा माहे २८।१० शके १६६६ वैशाख सुध १ पावेतों रुा ६० वजा ५, बाकी.

१०९०॥
रुपये १०० गुा **राजजी गुजर**

An account of Nagojirao Patankar.

---

No. 10 श्री फालगुन शुा ६ शके १६६२
फेब्रुआरी १०,१७४१

हिसेब राजश्री **केसो महादेव वैशंपायन** सुा इसनें आर्बैन मया आलफ. जमा येणें रुपये. ११५० यैन खत शके १६६२ रौद्र संवत्छरे फालगुन सुध ६

४८॥· व्याज दरमाहा दरसदे रुा १॥· प्रो शा ता आषाढ शुध ६ मुा माहे ४
येकून व्याज रुा ८०॥· वजा वरातींचें व्याज. रुा २७।-. बाकी ५२॥≋. वजा बारोत्रा ४।≋. बाकी.

११९८॥·

शके १६६३ दुर्मति सवछर

| | यैन | व्याज दरसदे १॥- |
|---|---|---|
| वैशाख सुध ११ चिठी **त्रिविक्रम सेट गुजर** ता आशाढ सुध ६ मुा माहे १०२४ | ८७५ | २७।- |
| आशाढ सुध ६ चिठी वरातजमा ता **बेंकाजी** | २७५ | ० |
| | ११५० | २७।- |

सदरहू व्याज वजा दिल्हें आहे.

बाकी येणें आषाढ शुध ७ व्याजपैकीं रुये ४८॥·
सुा इसने भाद्रपद वद्य ९ जमा दुकानीं रुपये २९
बाकी येण १९॥·

॥· सोड
१९ आश्विन सुध १४

१९॥·

बाकी ०

An account of Keso Mahadeo Vaishampayan.

---

No. 11 श्री फालगुन शु. १०।१६६२
फेब्रुवारी १४।१७४१

बंधुवर्य सिरोमणी राजमान्यता
राजश्री **बालंभट** ता राजश्री
**विस्वनाथ भट** वैद्य दाजी

स्वामी गोसावी यासि.

सेवक **राघोबा दरवे** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति, येथील क्षेम फालगुण सुध दशमी पावेतों आपले कृपेनें जाणून स्वकीये स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. गतवर्षीं स्वामीपासून कापडाचे खरेदीबदल रुपये येक हजार घेतले. येका वरसाचा बोल केला होता. त्यास यैवज जमा जाहाला तो मुदत जाहाली नाहीं, याकरितां तो यैवज मागती कापडास रवाना केला. रुपयाची तो मुदत जाली. यैसीयासी स्वामीस विनंति लिहिली आहे, तरी कृपा करून व्याजाचा हिसेब वारून घ्यावा आणि रुपये ठेवावे.

ंत्याजांपैकीं पेसजी रुपये ५० पनास पावले आहेत. बाकी रुपये ७० सतर राहिले, ते हलीं राजश्री **गणेशपंताकडून** देवविले आहेत. ते घेतले पाहिजेत. सर्व प्रकारें भरंवसा आपला धरिला असे. आपणाविरहित ईश्वराखालें दुसरा सखा नाहीं. आम्हांस बंधु त्रयामधि लेखावें. भेटीचा हेत बहुतसा आहे. होईल तो सुदिन असे. विनंति अमान्य केलीं न पाहिजे. आणिखीही कांहीं प्रयोजन लागलें तरी माणूस पाठवितों. अलक्ष केलें न पाहिजे. बहुत काये लिहिणें. कृपा करीत असिलें पाहिजे. आम्हीं स्वामीचे पदरींचे आहों. आपण वचन दिलें आहे तें चितांत धरून आहों. हे विनंति लक्ष. शके १६६२ रौद्र सवछरे फाल्गुन सुध दशमी हे विनंति. रुपये येका वर्षां अलिकडेस देऊं. हे विनंति लक्ष.

Raghoba Darve sends interest for the loan he had taken from Vaidya Brothers and requests them to look upon the writer with affectionate attention, as a man of his family.

---

No. 12 श्री १७ जिल्हेज

फाल्गुन वा। ४-१६६२

फेब्रुआरी २३,१७४१

श्रीमंत राजेश्री **विश्वनाथबावा वैद्य** स्वामीचे सेवेसी.

सेवक **निलो रघुनाथ** कृतानेक सा। नमस्कार विनंति. उपरी येथील कुशल ता। छ १७ माहे जिल्हेज मु। **श्रीपुरुषोत्तमक्षेत्र** जाणून स्वामींचे कृपेंकरून सहमंडली सुखरूप आसो. विशेष. आपण पत्र छ १४ शवालचें पाठविलें तें छ ११ जील्हेजीं पावली. लिहिलें कीं बहुत दिवस समाचार कलत नाहीं आणि पत्रही लिहीलें नाहीं. तरी जेव्हां आम्ही श्रीमंतांस पत्रें लिहिलीं त्याबरोबर स्वामीस पत्र लिहीत गेलों. पावलीं न पावलीं ईश्वर जाणे. आहोरात्र स्वामीचें स्मरण आंतःकरणापासून आहे. येणें म्हणून लिहिलें, त्यास श्रीमंताचीं पत्रें राहणें म्हणून येतात. ईकडील मजकूर पुरवील पत्रीं साकल्य लिहिला आहे. त्याजवरून कलेल. कर्जामुलें आडकून राहिलों आहों. दोन महिने पाहूं, कांहीं निर्गम जाला तर. न जाला तरी खामखा दोन महिनीयाउपरी येऊं. श्रीमंतीं बुज चांगली केली. त्यास पत्रें लिहिलीं आहेत, त्याजवरून साकल्य निवेदन होईल. सारांश तुमचे सिपारशी, वगवसीला हिमाईत. तुमची तुम्ही आपले जागा संदेह न करणें. सर्व गोष्टीस श्री साक्ष आहे. आपण प्रसंगी होते, म्हणोन दोन गोष्टी आपण बोलिले, परंतु रा। **तुलजोपंतीं** फार गिला लिहिला. आपण समई नसतें तर जें होणें तें तुम्ही रुबरू पाहिलें असेल. बरें. सर्व थोर. सारांश बारा वर्षें रा। **भास्करबावाचे** हातास यश आलें. आमचें अन्न या जागाहून चलबिचल जाहलें. आपणांस सुचना लिहीली आहे. पदरींचे आहों. शेवा घडेल तो सुदीन. लोभ करणें हे विनंति.

Nilo Raghunath, an informant of Marathas, writes from Purushottamkshetra in Madras to Vishwanathbhat as to when he is expected back to Satara. He was in the employ of Bhaskar bhat Vaiday for 12 years. His letter of 26-4-1741 gives details of the capture of Chandasaheb and the fort of Trichanapally.

---

१ सन्मान. २ मोठ्याचा आश्रय. ३ ?

No. 13 श्री १९ जिल्हेज.
फा. व. ६।१६६२
फे. २५,१७४१

श्रीमंत राजश्री **बाळंभट** (व) **विश्वनाथभट**
स्वामीचे सेवेसी.

दो॥ बा॥ **रायाजी जिनगर** पेठ **शनवार** सु॥ इहिदे अर्बैन मया व अलफ रो॥ **पंत सचीव** यांणीं दरमाहेचे ऐवजीं रु॥ ४१९॥ चारसे साडे येकुणीस रुपये आपण भरून पावलों सु॥ इहिदे अर्बैन छ १९ जिल्हेज.

निशाणी-कऱ्हवत

This is a receipt given, by Rayaji Jingar [Tin maker], of Rs. 419-8 to Vaidya Brothers who paid the amount, out of the monthly payment to be paid by Pant Saheb to him.

---

१ दस्तक बमोजी—करारा॥प्रो॥.

---

No. 14 श्रीशंकर फा. व. १०।१६६२
मार्च १,१७४१

श्रीमंत राजश्री **बालंभटजी** व ता॥ **विश्वनाथभट** स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक **माहादजी अनंत गोडबोले** सां॥ नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल ता॥ फा॥ वद्य दशमी पावेतों येथास्थित आसे. विशेष. राजश्री **माहादाजी नाईक निंबाळकर** यांचा हस्ती घाहाण ठेऊन रुये ४००० मागतात. व्याज रुये २ प्रो॥ देऊं म्हणतात. हतीची किंमत रुये ९००० पावेतों ते सांगत आहेत; परंतु लोक तो म्हणतात कीं, रुये सात हजार यावे, यैसा विचार आहे. तीर्थस्वरूप राजश्री **दिनकरपंत** मामा यांचे विचारांत आलें आहे. जेष्ट अखेर रुये देऊं, यैसा वायेदा करितात. नाहीं तर गाहाण डुले, याप्रमाणें करार आहे. निदार्नी पांच सातसे रुये कमी दिल्हे तरी कबूल करितील. हतीस चरिंदा जो लागेल तो त्यांचा ते लावितील, चाकर त्यांचे विचारास येईल तर, उत्तर पाठऊन द्यावें. आम्हांकडील यैवज पंधरा दिवसीं प्रविष्ट होईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना. पूर्वीचे रुये ४००० आपले आहेत तेही येतील. कोणे गोष्टीची फिकीर नाहीं. शिसोबासा त्यांचा. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

Mahadji Anant Godbole writes to Vaidya Brothers that Mahadaji Naik Nimbalkar may be paid Rs. 4000 as he is keeping his Elephant as Mortgage. Dinkarpant Mama is arranging the settlement. Mortgage value of the animal, they say, may go to Rs. 9000. The transaction is worth going in.

---

१ नफानुकसान.

No. 15 श्री+शंकर २३ जिल्काद
पौ छ ६ माहे जिल्हेज. फा. व. १०।१६६२
मार्च १, १७४१

राजमान्ये राजश्री **पांडुरंगपंत** व ता राजश्री **यादो मोरेश्वर** गोसावी यासी.

पो **बाळंभट** व **विश्वनाथभट** वैद्य असिर्वाद. उपरी येथील कुशल जाणऊन स्वकिये कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष परगणे **बीडचे** बाकीचे रुा माघ मासचा हाप्ता व चैत्र मासचा हाप्ता यावा त्यास अद्याप आले नाहीं. हे गोष्टी काये आहे, तरी देखत पत्र रुा झाड्यानसीं पाठवणें. अगर सावकारी निशा करून पाठवणें. या कामास **सोनजी पवार** व **तुळाजी खीरसागर** पाठविले आहेत. यांसी खर्चास रुपये २५ पंचवीस आदा करणें. रा छ २३ माहे जिल्काद बहुत काये लिहिणें +हे आशिर्वाद.

Vaidya Brothers ask Pandurangpant and Yado Moreshwar to pay, for the instalments of Magh and Chitra, the revenue of Beed.

---

\+ फुलीपुढील मजकूर लेखकाचे हातचा आहे.

---

No. 16 श्री +रामचंद्र २३ जिल्हेज
फा. व. १० । १६६२
मार्च १, १७४१

राजश्री **बाळंभट** व **विश्वनाथभट** वैद्य गोसावी यासि.

सेवक **चिमणाजी नारायेण** सचिव नमस्कार सुाइहिदे आर्बैन मया अलफ. सरकारांत सर्चास रुा पाहिजेत. तरी पोता रुपये १००० येक हजार देणें. छ २३ जिल्हेज सदरहू रुा कर्ज देणें.

××
लेखना चतुर्दल चौकोनी
वधी दुहेरी मोर्तब

Pant Sachiv borrowed money from Vaidya Brothers Rs. 1000 for daily expenses.

---

No. 17 श्री फा. १६६२
मार्च १७४१

राजश्रियाविराजि (त) राजमान्य राजश्री **विश्वनाथबावा** वैद्य स्वामीचे सेवेसी.

पोष्य **गोविंद सामराज** सां नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावलें. सुताराविसीं लिहिलें, त्यास सुतार दोघेजण देविले आहेत. येऊन पावतील. पंधरा दिवस वेठ घेऊन निरोप दिल्हा

पाहिजे. अडीच हजार रुये राजश्री पंतांनीं देविले त्याची चिटी लेहून पाठवणें, म्हणून लिहिलें. यैसी यास नेरियास रामनवमीस पंतायां आरण येतील, तेव्हां यैवज सालवजाविसी विनंती करून यैवज नेमून घेऊं, आणि स्वामीस चिटी लेहून देऊन. आम्हांस यैवज खरा करून घेऊं दिल्हा पाहिजे. त्याची मुदतही पुढेंच आहे. चिटी लेहून देऊन. पखालेसाठीं मागितलें त्यासी कातड्याचा बहुत तोटा आहे. त्यासी पखाल करविली असे. मुस्तेद जालिया उपरी पाठऊन. कृपा असो दिल्ही पाहिजे. हे विनंती.

Govind Samraj writes to Vishwanathbhat that the carpenters should be given work for 15 days only and allowed to go. Pant Sachiv has asked to pay him Rs. 2500 which he would pay when he would go to Nere for the Ramnavami festival. The Pakhal (leather bag for carrying water) when ready would be sent, though leather became very dear.

---

No. 18 श्री शके १६६३ सन १७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळंभट बावा व विस्वनाथ बावा वैद्य स्वामीचे सेवेसी.

पो गोविंद सामराज कृतानेक सां नमस्कार. विनंती येथील कुशल जाणून स्वकीये लेखन केलें पाहिजे. विशेष, स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावोन वर्तमान कळों आलें. लग्नाच्या साहित्याचा मजकूर लिहिला, त्यासि किरकोळ साहित्यें राजश्री दाजीपंती पैरवी[1] केली आहे, त्या प्रो प्रविष्ट होईल. पत्रावलीस गुरव अथवा पत्रावलीच पावत्या होतील. पखालेविसीं लिहिलें, त्यासि चिरंजीव रामचंद्रपंतास पत्र लेहून वडगांवास पाठविले आसे; आपणांसी पखाल मांन्य केली असली तरी पाठऊन देऊन. विदित जालें पाहिजे. लोभ असो दिल्हा पाहिजे हे विनंती.

पो सिवाजी नारायण सां नमस्कार विनंति. बहुता दिवसीं कार्याकरितां विनंति केली, तिची उपेक्षा केली. बागपटीचा यैवज आमचे गांवचा देतील तर कार्य होईल यैसें सांगितलें. यैसी यांस दुसाला यैवज तो[2] आपणास हात रोखियाचे समई पावला. आम्हाकडे कांहीं यैवज घाडला नाहीं; कार्य न केलें बरें. आम्हांस सर्व प्रकारें आपलाच भरवसा असे. हे विनंती.

Govind Samraj writes to Vaidya Brothers how he has arranged to supply the things required for the marriage. Gurav or Patravali will be sent. The Pakhal if ready will also be sent.

Shiwaji Narayan Bhave writes to Vaidya Brothers that Bagpatti of two years has been already recovered but not sent to him. He relied on their help for the festival.

---

१ व्यवस्था. २ तयार.

No. 19 श्री शके १६६३
सन १७४१

राजश्री **बाळकृष्ण वैद्य बावा** स्वामीचे सेवेसी

पो॥ **गोविंद सामराज** कृतानेक नमस्कार. विनंती उपरी पत्रावली **बावडे** येथील गुरवाबा॥ सुमार २५० अडीचसे पाठविल्या आहेत. घेऊन उत्तर पावलियाचें दिल्हें पाहिजे. कृपा आसो दीजे हे विनंती.

Govinl Samraj sends to Balambhat Vaidya [also called Balkrishnabawa] 250 patravalis [circular dish prepared by stitching leaves] possibly for use in a marriage performed in Vaidya family.

---

No. 20 श्री शके १६६३
सन १७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बालंभट बावा** व
राजश्री **विश्वनाथभट बावा वैद्य** स्वामीचे सेवेसी.

पोष्ये **रामचंद्र सामराज** सा॥ नमस्कार विनंती. येथील कुशल जाणौन स्वकीये कुशल लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष तीर्थस्वरूप राजश्री सुभेदार यांणीं **गालेर-नरवरीहून** आम्हांकडे वरात केली आहे, दाहा पंधरा हजारांची केली आहे. त्यास थोडा बहुत यैवज मेलऊन दिल्हा. बाकी रुये ७२५० साडेचहातरसे पाहिजेत. याकरितां राजश्री **लक्ष्मण भिकाजीआपा** स्वामींकडे पा॥ आहेत. तरी सदरहू सवासात हजार रुपये आगत्य-रूप दिल्हे पाहिजेत. सवोत्रियाचे व्याजे दिल्हे पाहिजेत. पूर्वीपासून पदरचे आहो. आपण चालवीतच आहेत. उतर आलें म्हणिजे, खत पाठऊन आणि व्यास यैवज देऊं त्यास प्रविष्ट केला पाहिजे. व्याज हलकें पडें तें करावें, आम्हाकरितां लिहिल्याप्रा॥ तेरीख मान्य करावी, म्हणिजे आम्हांस थोडें बहुत हलकें पडेल. अनमान येकंदर न करावा. साचौ महिन्या यैवज उतरोन देऊन. आपल्या भरोसियावर आसो. उतर आलें म्हणिजे चिटी करून. विदित जालें पाहिजे. कृपा असो दिल्ही पा॥ हे विनंती.

सेवेसी **सिवाजी नारायेण** सां॥ नमस्कार. लि॥ परिसोन कार्य करावें हे विनंती.

Ramchandra Samraj writes to Vaidya Brothers that Subhedar Govind Samraj has, from Gwaliar Narwar, made a demand of 10 or 15 thousands and was paid a part of the sum and only Rs. 7250 are wanting. They should therefore pay the amount which will be returned in 4 or 6 months and for which interest should be charged at 6 P. C.

---

१ व्याज.

No. 21 श्री श. १६६३
स. १७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बालंभटबावा वैद्य** स्वामीचे सेवेसी.

पोष्ये **गोविंद सामराज** सां नमस्कार. विनंति येथील कुशल लेखन केलें पा विशेष स्वामींनीं येकदोन पत्रें पाठविलीं कीं, दाहा हजार रुये आमचे कर्ज पैकीं **विसाजीपंत जोग** यांचे गुमस्तेयाकडे पाठऊन जाब पाठवणें म्हणून लिा, त्यासि आमचा पैका तिकडील येणार म्हणून मार्गप्रतीक्षा केली, त्यासि दिवस गत लागली. यास्तव मुबदला करून राजश्री **विसाजीपंत जोग** यांचे गुमस्तीयाकडे दाह हजार रुये भरून त्यांचे नांवें जाब गुमस्तियाचा आमचे गुजारतीनें स्वामींनीं रुये देविलेचा जाब पा असे, त्याजवरून कळों येईल. याजउपर तूर्त चिटी न करणें. तिकडील यैवज आला म्हणजे आधीं आपला यैवज उतरून देऊन. तूर्त चिटी आतां न करावी. पहिले मामलेदारांचा गुंता पडला, यास्तव यैवज आला नाहीं आणि स्वामींनीं निकड केली तरी रुये येतील. चिंता न करावी लोभ असो दिल्हा पा हे विनंती.

Govind Samraj informs Balambhat Vaidya that according to his instructions he paid Rs. ten thousands to the agent of Visajipant Jog in satisfaction of debt and got receipt. The remaining debt will be paid immediately on receipt of the revenue of the Mamlat and no more demand for it should be made.

---

No. 22 श्री श. १६६३
स. १७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बालंभटबावा वैद्य** स्वामीचे सेवेसी.

पो **गोविंद सामराज** सां नमस्कार. विनंति येथील कुशळ जाणून स्वकीये कुशललेखन करीत गेलें पाहिजे. विशेष ता कर्यात मावळ **खेडेबारें** येथील निशा रुपये अडीच हजार स्वामींचें देणें, त्या यैवजपैकीं हलीं रुा ३०० तीनसे **भवा (न) जी मांढरे** याजबरोबरी पाठविले असेत. घेऊन उत्तर पाठविलें पाहिजे. पेशजी दीड हजार रुपये स्वामीचे कर्जास पाठविलें होते, त्यास राजश्री **सदाशिवपंतांनीं** लेहून पाठविलें कीं, आपल्याकडे यैवज देऊन माघील मितींचें उत्तर घेऊन पाठवितों. त्यास उत्तर दिढा हजाराचें अद्याप पाठविलें नाहीं, तरी राजश्री **सदाशिवपंताकडे** ज्या मितीस आम्हीं रुपये पाठविले आहेत त्या मितीची आपण आपल्याकडे निशा करून घेऊन आम्हांस उत्तर पाठविलें पाहिजे. दरबारचें वर्तमान लिहित गेलें पाहिजे. लोभ असो देणें. हे विनंति.

Govind Samraj writes to Balambhat how he has arranged to pay the revenue of Karyat Maval Khedebare in order to pay his debt.

---

No. 23 श्री श. १६६३
स. १७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **विस्वनाथभट बावा** स्वामीचे सेवेसी.

पा॰ **गोविंद सामराज** नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष आम्ही **वाईस** पत्र पाठविलें होतें. त्याचें उत्तर आलें नाहीं. **गालियेर-नरवरचा** मामला केला त्यासी भरणा जाला पाहिजे, यास्तव वीस रुपये आपण अनकूल पुण्यांत उतरून घ्यावे. अनमान कांहीं न करावा. येविसीं काय तें उत्तर पाठवावें. आपण **भोरास** कधीं आले, मुक्काम येथें किती दिवस, पुणियासि जाणें आहे, कीं माघारें जाणें होईल, हें उत्तर पाठविलें पाहिजे. लोभ असो दिल्हा पा॥ हे विनंती.

Govind Samraj requests Vishwanathbhat to pay Rs. 20,000 in Poona in order to secure the Mamla of Galiar Naravar. He also wants to know when he went to Bhor and when he would move to Poona.

---

No. 24 श्री शके १६६३
सन १७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बाळंभट बावा वैद्य** स्वामींचे सेवेसी.

पा॰ **गोविंद सामराज** कृतानेक नमस्कार विनंती येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन केलें पाहिजे. विशेष स्वामींनीं मागील यैवजावर चिटिया पाठविलिया त्यासी दाहा हजार रुपये दिल्हे. जाब **जोगा**कडील गुमस्तियाचा मार्गे पाठविला व आणखी ती हजारांची चिटी पाठविली, त्यासी गुदस्ता पेसजी मामलेदारानें बईदा केला, त्यास्तव पैका वसुलांत आला नाहीं. साल मजकुरीं तो मामलेदार दूर करून दरोबस्त मामला आमचे स्वाधीन केला. त्यासी सालमजकुरींही रसदेचा भरणा करावा लागतो. त्यासी स्वामींनीं गुदस्ताप्रमाणें यैवज भरणीयासी द्यावा. आपली बाकी राहिली ते महिना पंधरा रोजीं तिकडील यैवज आलिया उपर उतरून देऊन. तूर्त त्या यैवजावर वराता न करावा. आणखी लिा प्रो यैवज भरणीयासी द्यावा. अनमान न करावा. येविसी राजश्री **मलहार नाईक बावा** व राजश्री **लक्ष्मण यादव** विनंती आमचेविसीं करतील. ते मान्य करून यैवजाची करारी करून उत्तर पाठविलें पाहिजे. लोभ असो दिल्हा पा॥ हे विनंती.

Govind Samraj writes to Balambhat the deteils of his money transactions with him and requests to pay him more money and not to send cheques for the money already due from him. He hopes to realise this year's money as the troublesome Mamlatdar is removed.

---

No. 25 श्री छ ४ मोहरम
चै. शु. ६।१६६३
मार्च ११, १७४१

राजश्री **विश्वनाथभट वैद्य** गोसावी यासि.

सेवक **चिमणाजी नारायेण सचीव** नमस्कार सुा इहिदे आर्बैन मया अलफ. देणें

दरमाह मार्गसीर्ष मास पैकीं **सरीफजी भो** मारफात राजश्री **धोंडो गोपाल** रुा २१० दोनसे दाहा देविले असेत. तुम्हांकडे हस्ता **कर्डे रांजणगांव** चैत्र शुध प्रतिपदेचा येणें, त्यापैकीं देणें. छ ४ मोहरम

××

समाप्तिमुद्रा, लेखना चतुर्दल चौकोनी.

वधि

बार

Pant Sachiv asks Vishwanathbhat to pay Sharifji Bhosle's man Dhondo Gopal Rs. 210 out of the instalment of the revenue of Karde Ranjangaon to be received on Padva from him.

---

No. 26

चैत्र व. १०।१६६३

मार्च ३१, १७४१

छ २४ मोहरम इहिदे आर्बैनपासून बाळंभटाच्या व विश्वनाथभटाच्या स्वारीचे खासगत जमाखर्चावरून काढलेले मुक्काम.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| छ. | २५ | मोहरम | मंगळवार | १।४।४१ | बोरगांव ता. | वाळवे |
| ,, | २६ | ,, | बुधवार | २।४।४१ | सागरेश्वर | ,, |
| ,, | २७ | ,, | गुरुवार | ३।४।४१ | रेठरे | ,, |
| ,, | २८ | ,, | शुक्रवार | ४।४।४१ | ,, | ,, |
| ,, | २९ | ,, | शनिवार | ५।४।४१ | ,, | ,, |
| ,, | ३० | ,, | रविवार | ६।४।४१ | ,, | ,, |

,, १९ सफर वैशाख व. २।१६६३, २१।४।४१ रोजीं दोघे बंधु एकत्र.

,, ३ रावळ जेष्ठ शु. ५।१६६३, ८।५।४१ शिरवळ

,, ५ रावळ ,, ,, ७ ,, १०।५।४१ खेड

Halts of Vaidya Brothers culled out from the accounts.

---

No. 27

श्री

श. १६६३

स. १७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **लक्ष्मुमणपंत** स्वामीचे सेवेसी.

सेवक **गोविंद केशव** सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन केलें पाहिजे. विशेष तुम्हो पत्र पाठऊन सांभाळ करीत गेले पाहिजे. यानंतर **मोरू भगणा** यासी खादी १ येकून किंमत रुा १॥ व फाडी व फडके हात तीन येकून पावला, येकूण पावणेदोन रुा दिल्हे. यानंतर राजश्री **पंतसचीव** यांची चिटी रुा येक हजार चवदा रुा आली होती ते माघारी पाठविली. त्यास तुम्ही बोलिलेत कीं, आम्ही **भोराकडून** जातो. हिसेब कितेक पाहून लिहून पाा, म्हणून आपण बोलिले याजकरितां चिटी माघारीं टाकली. तुम्हांस कळावें म्हणून लिहिलें असे. तीन हजार रुा चिटी केली, त्यास यैवज राजश्री **कृष्णाजीपंत** यांनी मान्य केलें कीं, हजार रुा देतों व **जोग** याजवरी

दोन हजार शो चिटी पा ते शो देत नाहीं. त्यास राजश्री **कृष्णाजीपंत** याजकडील शा तीन हजार घेऊन त्यास देतों; आणिक येक चिटी **व्यंकटराव** म्हणून प्रहस्त निा **पंतसचीव** होता त्याची चिटी रुा शंभर शा केली तीही माघारीं पाठविली. वरकड वर्तमान लिहून पाठवणें. श्रीमंत येऊन आठ रोज जाहाले. आधिकोतर वर्तमान कांहीं त्याहावें ऐसें नाहीं. + बहुत काय लिहिणें कृपा आसो दीजे हे विनंती. याज सामोरी माणसास वैरणीकरतां ८॥ तीन आणे दिल्हे आसेत. गुा **मोरसेट** हे विनंती.

Govind Keshav Sathe writes to Laxman Balal Joshi that the demand of Pant Sachiv of Rs. 1014 was rejected as he did not receive from him the accounts as promised. He paid Rs. 3000 to Sachiv which he borrowed from Krishnajipant Jog and Venkatrao was of no use to him.

---

No. 28 श्री चै. व. ११।१६६३
एप्रिल १,१७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **रामचंद्रपंत** स्वामीचे सेवेसी.

सेवक **गोविंद केशव** सां नमस्कार विनंती. येथील कुशल ताा चैत्र वाा ११ पावेतों कुशल आसो. विशेष आपण खासगत हिसेबाचा मजकूर लिा त्यास येका दो दिवसी लिहून पाठवितों. राजश्री **गोविंद नाईक दातार** यांनीं येवजाविसीं लिा आहे त्यास येवज देवावयाचा असला तरी लिहून पा. राजश्री **नानाजी नाईक जोसी** याचा येवज **वराडीहून** दाहा हजार रुये **पुणियांत** आले व **सातारियास** दाहा हजार येकूण वीस हजार रुये आले आहेत. त्यास आपण साहा हजार रोयाची चिटी देविली होती ती माघारीं गेली आहे. याजकरितां ते रुा, त्यांचा येवज आला आहे म्हणोन घेणार नाहीं, असें दिसतें. यावरून रा. **गोविंद नाईक दातार** यासी येवज देवावयाचा असिला तरी याद पाा आहे. यादीबरहुकूम द्यावा. बहुत काये लिहिणें. कृपा असो दीजे हे विनंती.

Govind Keshav Sathe writes to Ramchandrapant Karkare that he would soon send the accounts and that as Nanaji Naik Joshi has paid Rs. 10,000 at Poona and 10,000 at Satara, Govind Naik Datar being in need of money may be paid the required amount, according to the details sent.

---

No. 29 श्री वै. व. ७।१६६३
एप्रिल २६,१७४१

श्रीमंत राजश्री **बालंभट वैद्य** व **राजश्री विश्वनाथभटजी** स्वामीचे सेवेसी.

सेवक **नीलकंठ रघुनाथ** कृतानेक सां नमस्कार. विनंति ताा वैशाख बहुल ७ जाणोन मुा प्रांत **कोलार** क्षेम असो विशेष. **त्रिचनापलीस** लष्कर जाऊन तीन महिने वेडा घालून

बसलें होतें. श्रीकृपेनें जागा हस्तगत जाहाला. राजश्री **सेनासाहेब सुभा** यांणीं जीवाभ्यश्रम केला आतीशयें **त्रिचनापलीवर.** यैसा केला कीं, ढाला खंदकावर देऊन खासा डेरा गोलीच्या मारात दिला. लस्कर चौगीर्द गोलीच्या मारांत उतरून यवनास स्थलतीज केला. राजश्री **फत्तेसिंगबावा त्रिचनापलीस** आले, तेव्हां **चंदाखानाकडील रामराव दिवाण** येऊन दोन लाख रुा देऊं, यैसी बोली करून लस्कर कूच करून जावें यैसा सिद्धांत होऊन रुा घ्यावे, आण उठोन जावें. राजश्री **रघोजीबाबानीं** हा मनसबा मोडून जागाच घ्यावा हाच सिद्धांत केला, आण आतीशय मांडिला. रा फत्तेसिंगबावांनीं तो मनच काढिलें. जागा कसा रा **रघोजीबाबा** घेतात हेंच पाहात होते. यैसें दुईमध्यें **चंदाखाना**चा भाऊ **बडेखान मथुरेहून** पांच हजार पठाणानिसी नीटच लस्करावर चालोन साता कोसावर आला, तेव्हां लस्करांत सलाबत पडत चालिली. तेव्हां रा **भास्करपंत** फौजसुधां रवाना जाहाले. समागमें रा **फत्तेसिंगबाबा**कडील फौज, **हयबतराव जाधव, पांढरे, गोरखोजी** भापकर, यैसें जाऊन तीन रोज जूंज जुजोन **बडेखान** मारून फौज तुडवून टाकिली. **बडेखान** आम्हाकडील लोकांनीं मारिला. मुरदा **भास्करपंतांनीं** लस्करांस आणिला. यश ईश्वरें दिलें. उपरांतीक **त्रिचनापली** रामनवमीस शनिवारीं तीन घटिका रात्रीस फत्ते करून निशाण रा **फत्तेसिंगबाबा**चे चढविलें. **चंदाखान** बाहीर काढून आपले गोटांत ठेविला. **चंदाखानाची** खंडणी चार लाख रुा केले. अद्याप **चंदाखान** ओलीस रा **भास्करपंता**समागमें आहे. **भास्करपंत वराडांत** गेले. सविस्तर आपणास कलावें म्हणवून लिहिलें असे हे विनंती.

२

**त्रिचनापली** घेतल्या दिवसापासून रा **रघोजीबावांस** समाधान नाहीं. संधिवात जाहाला, यैसें निमित्य जाहालें. तेणेंकरून बहुत आतीशय जाहाला. उपाय माल जाहाला परंतु वेथा उतार खात नाहीं. चढाव होतो. रोजबरोज उतार होतो. दुसरे दिवशीं उताराहून चढ बहुत होतो. आशा न होती. परंतु श्रीकृपेनें पांचसात रोज आशा लागली कीं, उतार पडेल. दाहा पांचदां घाबरे जाहाले. आतां वाचते पंथास लागले, यैसें दिसतें. केवल आंग वेथा असती तर उतार पडता. प्रयोगी वेथा, त्यास उपाय कांहीं चालत नव्हता. त्यास श्रीकृपेचा उतार होऊन आरोग्य होत चालिलें. **त्रिचनापली** घेऊन रा **फत्तेसिंगबावांचे** स्वाधीन केली. **फत्तेसिंबावांनीं मुरारजी घोरपडे** यास आंत ठेवून कूच करून आले. तुम्ही म्हणाल की, रा **रघोजीबावांनीं त्रिचनापलीस** आपले लोक ठेऊन जागा राखला कां नव्हता? तर रा **स्वामीची** आज्ञेविना जागा कसा कबूल करावा! याजकरि(तां) **फत्तेसिंगबावांचें** स्वाधीन केला. त्यांणीं **घोरपडे** ठेविलें. पुढें जें होणें तें होऊत. जागा बहुत चांगला. राजधानी, परंतु

३

रा **फत्तेसिंगबावांनीं** हातचा दवडिलासा दिसतो. रा रघोजीबावांनीं वाईट बरें म्हणावें तर रा **जानोजी बावास** भेटीस आणीत होते, ते प्रसंगीं दरबारींच **चौकी-चंदावरचें** राज्य घेऊन **जानोजी भोसले** यास नेऊन ठेवणार. याजकारितां **त्रिचनापली** ज्या दिवसापासून घेतली त्या दिवसापासून वाईट बरें सर्व रा **फत्तेसिंगबावांनीं** कबूल **करून** जागा आपला केला. आम्हाकडील कोणी काडीमात्र **त्रिचनापलीस** राहिला नाहीं; **परंतु** जाग्या घ्यावया श्रम खुद जातीनिशी **बावांनीं** केला तो श्री जाणे. राजश्री स्वा-

मी जो तुकडा देतील, तोच आपणांस श्रीयस्कर जाणौन निष्ठेनें आहेत. प्रसंगीं तुम्हीं आहा. यासही भरवसा तुमचा आहे. आद्यावत रघोजीबावांस तुमचें कर्तुत्व कांहीं दिसोन आलें नाहीं. करून दाखवाल तर लौकिक तुमचा उत्तम आहे. उभयतांस चित खुलासा नाहीं. लोभ केला पाहिजे हे विनंति.

रा गणोबा नाईक स्वामीस नमस्कार.

Nilkant Raghunath writes to Vaidya Brothers at Satara the detailed account of the capture of Trichanapaly and Chanda Khan's removal to Berar by Bhaskarpant Kolatkar. Raghoji at this time suffered from rheumatism and hence handed over Trichanapaly to Phatesing Bhosle who gave it in the hands of Murarrao Ghorpade.

---

१ मोर्चे बंदी, झुंजण्यास तयारी. २ स्थल ताराज, जागा उध्वस्त किंवा बेचिराख. ३ धास्ती. ४ मधून मधून.

---

No. 30 श्री वै. वद्य ९।१६६३
एप्रिल २८,१७४१
नकल

राजश्री बाळंभट वैद्य व बापू वैद्य यासी.

आज्ञा केली ऐसिजे. मौजे पिंपवडे येथून कूच केलें, ते संध्याकाळीं फलटनास पावलों. हें वर्तमान तुम्हांस कळावें म्हणून लिा असे. बहुत काय लिहिणें.

It seems Shahu wrote this letter to Vaidya Brothers informing that he left Pimpoda and reached Phaltan the same evening.

---

श्री

No. 31 छ. २९ सफर
शु. १।३।१६६३
मे ४,१७४१

राजश्री बाळंभट व विश्वनाथभट वैद्य गोसावी यासि.

सेवक चिमणाजी नारायेण सचीव नमस्कार. सुा इहिदे आर्बैन मया अलफ. तुम्हांकडे कर्डे रांजणगांवीचा हता जेष्ठ सुध प्रतिपदेचा रुपये ५५० साडेपांचसे येणें, तो यैवज दरमाहकडे गुा अणाजी काटकर देणें बीताा.

९७ माघ मास पैकीं पदनसिंग भोा रुा १०० पैकीं वजा बटा रुा ३ बाकी.
९६॥= फालगुण मास मोगलीये
३५६।= चैत्र मासपैकीं मोरो नरहरी बक्षी रुा ४५९।= पैा
५५०
येकूण साडेपांचसे रुा देणें. छ २९ माहे सफर

पत्रारंभ मुद्रिका

Pant Sachiv asks Vaidya Brothers to pay Rs. 550 to Anaji Katkar for monthly expenses out of the instalment of Karde Ranjangaon due on 1st of Jyeshta.

---

No. 32 श्री ५ रावल इहिदे आर्बैन
शु. ६।३।१६६३
मे ९,१७४१

राजश्री **विश्वनाथभट** गोसावी यासि.

श्रो **अनाजी काटकर** दंडवत. विनंति उपरी राजश्री **पंतसचीव** यांणीं तुम्हांकडून रुपये ५५० साडेपाचसे देविले, ते गुा राजश्री **बालाजीपंत** भरुन पावलों. छ ५ रबिलोवल सन इहिदे आर्बैन मया अलफ बहुत काये लिहिणें हे विनंती.

Receipt of Anaji Katkar of Rs. 550 paid through Balajipant.

---

No. 33 श्री ५ रबिलावल
जेष्ट शु. ७।१६६३
छत्रपति मे १०,१७४१

राजश्री **गणोबा नाईक** गोसावी यासि.

अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो **नागोजी झुंझारराऊ घाटगे** विनंती उपरी. श्रीमंत **महाराज** राजश्री यांनीं आम्हांस खर्चास रुा **बालंभट** यांजकडेस रुा २००० दोन हजार देविले व्होते; त्यांनीं तुम्हांकडे चिटी लेहून दिल्ही, ते आपणांस रुपये २००० दोन हजार पावले. बहुत काये लिहिणें हे विनंती. सन हजार ११५० छ ५ माहे रबिलोवेल. बीकलम **नारो आपाजी** मुजुमदार निा रुा **झुंझारराऊ.**

A receipt givin by Nagoji Zunjarrao Ghatge for Rs. 2,000 to Ganoba Naik Kolatkar who directed Balambhat Vaidya to pay.

---

No. 34 श्री छ ५ रावल
जे. शु. ७।१६६३
मे १०,१७४१

राजश्री **गणाबा ना कोलटकर** गो॥ यासि.

सेवक **चिमणाजी नारायेण** सचीव सुा इहिदे आर्बैन मया अलफ. रोज गुा तुम्ही वहीस रुा १०० येकसे खर्च लिा आणि त्यांपैकीं रुा २५ पंचवीस राहिले, ते उदईक देतों, म्हणून मान्य केलें. याकरितां **तुकोजी ना** जासूद पा आहे. याजवळ आपली निशाणें घालून रुा २५ पंचवीस काल्ह्या शंभराचे सिलके बा देणें. छ ५ रबिलावल.




Pant Sachiv asks Ganoba Naik Kolatkar to pay Rs. 25 out of Rs. 100 to Tukoji Naik.

---

No. 35

श्री

६ रविलावल
जेष्ठ शु. ७।१६६३
मे १६,१७४१

श्रीमंत् राजश्री **बाळंभट** व **विस्वनाथभटबावा**
स्वामीचे सेवेसी.

सेवक **रामजी नलवडे** व **सेख्याजी संगीरराव** स्वार दिमत **नागोजीराव घाटगे** दंडवत विनंती सुा इहिदे आर्बैन मया अलफ. तुम्ही रा **गणोबा नाईक कोलटकर** यांजकडे दोन हजार रुपयांची चिटी दिली त्यास आम्ही रुपये २००० दोन हजार मारफत रा **त्रिकमजी गोविंदजी गुजर** यांचे दुकानीं भरून पावलों. हें कबज लिहोन दिलें सई छ. ६ रबिलोवल.

बीकलम **गोविंद हरी भिडे** निशाणी कट्यार

A letter by the servants of Nagojirao Ghatge to Vaidya Brothers acknowledging receipt of Rs. 2,000 given by Ganoba Naik Kolatkar through Trikamji Govindji Gujar.

---

No. 36

श्री

२० रा वल इसने आर्बैन
जे. व. ६।१६६३
मे २५, १७४१

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री **अंबाजी महादेव सुभेदार** व कारकून
पा **सुपे** गोसावी यासि.

सेवक **चिमणाजी नारायेण** सचीव नमस्कार सुा इसने आर्बैन मया अलफ. राजश्री **बाळंभट** व राजश्री **विश्वनाथभट** वैद्य याकडे मौजे **बऱ्हाणपूर** पा मजकूर येथील **बाबतीचा** मुकासा दिल्हा असे, ये विशई देशमुख देशपांडे व गावास अलाहिदा आज्ञापत्रें सादर केलीं आहेत, तरी तुम्ही मौजे मजकुरास ताकीद करून **बाबतीचा** यैवज याकडे वसूल देवणें. छ. २० रबिलावल पा हुजुर.




मोर्तब अष्टदली लंबगोल

सुरू सुदबार

An order by Sachiv informing Ambaji Mahadeo Subhedar of Supa that Babati mokasa of Barhanpur is granted to Vaidaya Brothers.

---

No. 37 श्री +शंकर २७ रावल
जेष्ठ व. १४।१६६३
जून ११७४१

राजमान्ये राजश्री आबाजीपंत व आपाजीपंत स्वामी
गोसावी यासि.

सेवक रत्नाकर विठ्ठल नमस्कार सुमा ईसने आर्बैन मया अलफ. राजश्री विश्वनाथ वैद्यांचे हरभरे खरीदी आम्हांकडे आहेत, त्यास तुम्हाकडे रुपये १०० संभर पो आहेत, त्यास कराडी बाजारनिर्खा प्रो हरभरे रास्ती खरीदी करून त्याजकडील कारकून आगर कोठवळे येतील, त्यांचे पदरीं घालणें. खाराखिरी करून हरभरे घेणें. आनमान न करणें. जानीजे जानीजे. छ २७ रबिलोवल. +बहुत काय लिहिणें हे विनंती.

Ratnakar Vithal requests Abajipant and Appajipant to buy gram for Vishwanathbhat Vaidya of Rs. 100. Vaidya and Ratnakar Vithal had mortgaged the Mamlat of Berar to advance money to Ranoji Bhosle.

---

No. 38 श्री ९ राखर
आषाढ शु. ७।१६६३
जून ९।१७४१

वेदमूर्ति राजश्री बालंभट व विस्वनाथभट वैद्य यासि.

प्रति तपोनिधि निरमलगिरी महंत आसीर्वचन. राजश्री राणोजी भोसले यांणीं तुम्हांकडून रुपये ४००० चार हजार देविलें होते. ते येणेप्रों भरून पावलों. बीतपशील.

| माघ मास अखेर रुा मा, | जेष्ठ मास अखेर मा, |
|---|---|
| पुरुषोत्तमभट सेवडे, रुपये | गोसावी नाईक अनगल रुपये |
| २००० | २००० |

येकूण रुपये सदरहूप्रमाणें भरून पावलों. सुा इसने आर्बैन मया अलफ. दुर्मति सवछरे छ ५ रबिलाखर आशाढ सुध ७

बीा संकराजीकानो

निा त्रिसूल

Receipt of Nirmalgiri Mahant for having received Rs. 4000 in Magh through Purushottam Shevade and Gosavi Naik Angal as settled in the contract of 1–10–40, given to Vaidya Brothers.

---

No. 39

श्री

छ. २२ राखर
आषाढ व. ८।१६६३
जून २५, १७४१

श्री राजा शाहूच
रण तत्पर रघुनाथसुत
वीश्वनाथ नीरं
तर

राजश्री **गंगाजी कंक** गोसावी यासि.

द अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री बालंभट व विस्वानथभट वैद्य आसिर्वाद. उपरी तुम्हांकडे तांदलाबदल रुा दिल्हे, यास बहुत दिवस जाहाले. पेसजी पत्र पाठविलें होतें, तेव्हां तुम्ही करार केला कीं, सराईस तांदलाची वाट करून देऊं. त्या अलीकडे दोनतीन वर्षे जाहालीं; परंतु तांदलाचा निकाल करून दिल्हा नाहीं. हे गोष्टी तुम्हा योग्य नव्हे. याउपरी पत्रदर्शनीं सात वर्षाचे वाडीदेखील तांदूळ सत्वर पाठऊन दीजे. या कामास **संभाजी कदम** पाठविला आहे. यासि रुा २ दोन देणें. रा छ २२ राखर. मोर्तब

सुद शिक्का व समाप्तिमुद्रा लंबगोल
दुहेरी

Gangaji Kank is asked by Vishanathbhat to send rice, as settled. Two years passed and no rice was supplied, though Rs. 30 were paid.

---

No. 40

श्री

अ. श्रा. १६६३
जुलै १७४१

राजेश्री **सचीवपंत** स्वामी गोसावी यांसि.

द श्रीसकलगुणालंकर्ण अखंडितलक्ष्मी आलंकृत. सदाराजमान्यविराजित स्नो **येसाजी मानेराऊ देशमुख** पाा **अंबडापूर** रा विनंति. उपरी येथील क्षेम जाणौन तुम्ही आपलें क्षेम लिहिनें. विशेषु. बहुत दिवस जाले, कांहीं वर्तमान कळूं आलें नाहीं. तरी साकल्य वर्तमान लिहून पाठवनें. आमचें वर्तमान तरी पूर्वी दोनचार पत्र सेवेसी पाठविलीं होतीं. त्यावरून वर्तमान कळलें असल. यैसी यासि तुम्ही भले लोक प्रसंगी असून आपनावर **अटोली**यांनीं कशोला केला त्यानें पारपत्य होऊन न आलें हें अपूर्व आहे. हरघडी पत्रद्वारें परामृश करीत जाणें. विशेषु काय लिा हे विनंती.

सन इहिदे इसने.
२०० २००

गुा दिक्षित परभारें
१००
बाकी १००

६१ अधिक श्रावण
शालजोडी गुा दामले
निा बाजीपंत
३९ श्रावण सुध
१० बाजीपंत देणें ब्राह्मण सकलाद
४ ताा पांडवा माा माहुली
रुा देणें
२५ शाल गोपाल्या
३९
१००

४९ फालगून देणें गोविंद नरहरी
साबणे गुा नारोपंत पोतनीस
निा गोपालया
४० वेंकणभट तेलंग अग्निहोत्री
२० बाजीपंत
२० गोपालजी बावा
७९ भास्कर कृष्ण निा बाजीपंत
५० यैन २९ व्याज येकूण ७९
१६८
बाकी ३२

Yesaji Mane Deshmukh of Ambadapur informs Pant Sachiv that though he was troubled by Atole, he did not care to check him.

---

१ छळणूक.

---

No. 41 श्री अ. श्रावण शु. ११६६३
जुलै २, १७४१

हिसेब कर्ज राजश्री सरलस्कर सुहूरसन
ईसने आर्बैन मया आलफ ईा ताा मार्गसीर्ष सुध ८

खत प्रतापजी सोमवंसी
२०० यैन खत श्रावण
अधीक सुध १
४८।= व्याज ताा मुा माहे
५।८ येकूण दर सदे
रुा २ प्रो ५२॥।
वजा बारोत्रा ४।=
बाकी ४८।=
५४८।=

खत निंबाजी खत
१२०० आश्वीन सुध १५
४७॥= व्याज ताा मुा
माहे २ रोज ५ दर
सदे रुा २ प्रों ५२
वजा ४।= बाकी ४७॥=
१२४७॥=

बाा पदनसिंग भो.
३००० कार्तिक सुध १२
६४॥।≡ व्याज ताा
मुा माहे रोज २९
येकून दर २॥ प्रों

खत निंबाजी
३५० कार्तिक वद्य ११
३।≡ व्याज ताा मुा माहे
रोज १३ दर २॥ प्रों
३॥। वजा ।- बाकी ३।≡
३५३।≡

रुपये ७०|||= वजा
५|||≡ बाकी ६४|||≡.

३०६४|||≡
३० बटा

३०९४|||≡

उसने येणें

३००० वर्षासन

८०० { लक्ष्मण भट
गोमुखी
मनोती बीड आंबड
यादो मोरेश्वर }

७५ बटा रुा २०००० पो

६२ बटा रुा ३१०० गुा

नारोवा नाा पैकीं

३९३७

तेरीज,

| अर्जे | यैन | व्याज | बटा |
|---|---|---|---|
| किता ५४८|= | ५०० | ४८|= | ० |
| किता १२४७|= | १२०० | ४७|= | ० |
| किता ३०९४|||≡ | ३००० | ६४|||≡ | ३० |
| किता ३५३|≡ | ३५० | ३|≡ | ० |
| किता ३९३७ | ३८७५ | ० | ६२ |
| ९१८१|= | ८९२५ | १६४|= | ९२ |

किता गुा गणोबा नाा
२००० भाद्रपद वद्य ९
१३७|| इाा ताा मार्गसीर्ष
सुा ८ मुा माहे २||
दरसदे रुा ३
प्राा रुा १५०, वजा १२||
बाकी १३७||

२१३७||

९१| मोर्त्ये जोडी पै.
आदा गणेशपंत
५२ मोर्त्ये ५
२८ जोडी १

९१| सोनें ८८८|||

९१|

२२२८|||
१४७ मोतीं

२३७५|||

हवाला रघोजी भो
रुपये
२००००
वजा व्याज इाा कार्तिक
वद्य १२ ताा मार्गसीर्ष
सुध ८ ताा रोज ११ दर
सदे रुा २|| प्रों रुपये
रुपये
१८३||

बाकी रुा
१९८१६||
ताा
८००० होन
११८१६|| रुपये नाणें

१९८१६||

१ एकंदर बेरीज

An account of Appaji Somavanshi Sarlaskar with the Vaidya Brothers, giving the names of persons for whom the money was paid.

१ प्रतापजी सोमवंशी
२ हवाला पदनसिंग
३ निंबाजी बायसे
४ यादो मोरेश्वर
५ हवाला रघूजी भोसले रु २००००
etc.

---

No. 42 श्री +रामचंद्र ६ जावल इसने आर्बैन
अ. श्रावण शु. ७।१६६३
जुलै ९, १७४१

राजश्री बालंभट व विश्वनाथ भट वैद्य गोसावी यांसि

सेवक चिमणाजी नारायेण सचीव नमस्कार सुा इसने आर्बैन मया अलफ देणें रदकर्ज सेनवाद गुाा गोवर्धनजती गोसावी रुपये २०० दोनसे देविले असेत देणें. छ. ६ जा लोवल अधिक श्रावण सुध सप्तमी. ××

समाप्तिमुद्रा अष्टदल पत्रा
चौकोनी वधिरयं
बार[1] भाति

Pant Sachiv asks Vaidya Brothers to pay Rs. 200 to Gowardhan Jati Gosavi in payment of the debt incurred from him.

---

१ सालवार.

---

No. 43 श्री +रामचंद्र जुलई १७४१
आधिक श्रावण १६६३

सकलगुणपरिपूर्ण राजमान्य राजश्री श्री. बालंभट व राजश्री विश्वनाथभट वैद्य स्वामी गोसावी यासि.

पोष्य भगवंतराव रामचंद्र कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन, स्वकीय लेखन केलें पाहिजे. विशेष. तुम्ही राजश्री संभाजी पडवळ व देवजी पवार या बाो पत्रें पाठविलीं तीं पावलीं. लिहिलें वर्तमान कळों आलें. महाराजांनीं अभय वचन देऊन राा संभाजी पडवळ यांची रवानगी केली. त्याप्रमाणें आम्ही दसरियास महाराजांच्या दर्शनास येतों. कीर्त अपकीर्त धणीयांची आहे. तुम्ही फंडीं मध्यस्त आहा. लोकोत्तर यश घेणें. राजश्री फत्तेसिंग बावा व राजश्री रघोजी भोसले कर्नाटकांतून मोहिम करून आले. त्यांच्या दर्शनानिमित्य पंढरपूर पावेतों महाराज श्री यात्रेस

जाणार, यैसें यैकिलें. मनसब विचार काये जाहाला तो लिहिला पाहिजे. राजश्री **बलवंतराऊ प्रधान** मोहिम करून नर्मदापार जाहाले म्हणोन वर्तमान आलें. तरी त्याकडील काय वृत्त हें लिहिणें. या प्रांतीचें वर्तमान तरी, **कोलापुरीं धाकटे महाराज** आहेत. **गोंदजी भोा** यासि इमानक्रिया देऊन **बेल-रोटी** पाठऊन आणिलें, त्यांचा विश्वासघात करून **संताजी घोरपडे** सिलेदार जिवें मारिलें. घोडीं पागेस लाविलीं. हत्यारें घेतलीं. हें वर्तमान परस्पर कळलेंच असेल. यामुळें सिलेदारांनीं येकवला करून **कोलापुरा**भोंवतीं धामधूम मांडिली आहे. आम्हावर सौ. **जिजाबाईसाहेब** यांचा इतराजी आहे. पुढें काय परिणाम होईल तो पहावा. सर्व आधार **महाराजांच्या** पायाचा व भरोसा मानिला आहे. रा **संभाजी पडवळ** यासि भाद्रपदमासीं **महाराजांकडे** व तुम्हांकडे पाठवून देतों. **कर्जदार जाहालों आहों. चिरंजीवाचें** लग्न होणें आहे. याचें संकट **महाराजांस** व तुम्हांस असावें. आमचें ऊर्जित जाहलियानें तुमचे चाकरीस अंतर होणार नाहीं. **आपल्या वडिलांची इमानक्रिया जतन** करणें. चतुर शाहाणे लोकाप्रती विशेष काये लिहिणें. **देवजी पवार** या बोा मेण वजन ८।· दाहा सेर पाठविलें आहे. घेऊन पावलियाचें उत्तर पाठविणें. बहुत काये लिहिणें. कृपा करावी हे विनंति**परहुजुर.**

Bhagwantrao Amatya writes to Vaidya Brothers the disturbed political condition of Kolhapur State in detail and says that he is not in the good graces of S. Jijabai and hence relies on the help of Shahu Maharaj and theirs also. He incurred debts and wanted money for the marriage of his son from them.

---

१ सरकारी कामांत, फडनिशींत. २ बेल व भाकर ( खात्रीकरतां असावी ).

---

No. 44 श्री+रामचंद्र जुलै १७४१
अ. श्रावण १६६३

पुरवणी राजश्री **बालंभट** व राजश्री **विश्वनाथ भट वैद्य** स्वामी गोसावी यांसि :—

विनंती. उपरी पेसजी तुम्ही तरवारेविसी लिहिलें होतें. त्यावरून हलीं राजश्री **संभाजी पडवळ** याबरोबर तरवार १ येक पाठविली आहे, घेऊन पावलियाचें उत्तर पाठविलें पाहिजे. **बेदरची** आहे जतन करणें. आमचें उर्जित जालिया तुमची सेवा घडेल, देवा ब्राह्मणाची सेवा घडेल. कृपा करणें हे विनंति पर हुजूर.

This is a supplementary letter writen by Bhagawantrao to Vaidya Brothers informing that the sword sent is worth preserving as it is made at Bedar.

No. 45 श्री १४ जावळ
अ. श्रा. १५।१६६३
जुलै १७।१७४१

फेरिस्त कर्ज येणें प्रों. मावळें.

| | | |
|---|---|---|
| २ | ५० | बालाजी विस्वनाथ चाफेकर |
| १ | ४० | वाघोजी राऊत हवाला नि। सुभानजी राऊत |
| ५ | १२५ | येसजी डोबर |
| ५ | ४३० | प्रतापराव सिलिंबकर |
| १ | ५ | कासिराव सिलिंबकर |
| २ | ४० | बालोजी ढवळा |
| २ | २६२ | बावाखान गोरी कात्रज |
| | ० | बाहिरजी सिलिंबकर |
| २ | ३० | गंगाजी कंक तांदळाबद्दल |
| ५ | २०० | येसाजी सोनवणी नाहवोकर |
| | १०० | येसजी सासवडा |
| | १० | लक्ष्मण त्र्यंबक |
| १ | ९॥ | इभ्राम चरवेदार |
| १ | | खंडो मल्हार नागर्ली |

२७

That is a list of persons who were debtors of Vaidyas and were iucluded in the list of debtors, printed on 21-1-1740, in the previous volume.

---

No. 46 श्री अ. श्रा. वं. ५।१६६३
जुलै २१,१८४१

श्रीमंत वेदशास्त्रसंपन्न राजश्री बालंभट व तथा राजश्री विस्वनाथ भट वैद्य स्वामीचे सेवेसी.

पोष्य हरि रघुनाथ जोग मो नादिवडे सांष्टाग नमस्कार विनंती येथील कुशल ता। अधिक श्रावण वदी ५ पावेतों समस्त सुखरूप असो. विशेष श्रीनारायणाचें तळें यास चिरे काढावयास हुनेरचंद लाविले आहेत. तयार करून तल्यासंनिध आणून ठेऊं. आणि स्वामीच्या दर्शनास यावें यैसा बेत आहे. भेटी होईल तो सुदीन. आपले घरीं समस्त सुखरूप आहेत.[1] विषेश ल्याहावें तरी रा। अनंतभट दामले मुखवचनें सांगतां विदित होईल हे विनंतिपर लक्ष.

Hari Raghunath Jog accepts to execute the construction of a lake of Narayan near Tiveri harbour.

---

१· कारागीर.

No. 47 श्री अ. श्रा. व. ६।१६६३
जुलै २२,१७४१

वेदमूर्ति राजश्री **बाळंभट** व राजश्री **विश्वनाथ भट** वैद्य स्वामी गोसावी
यासि :—

पोष्य **कृष्णंभट नवाथ्यें** कृतानेक नमस्कार विनंती उपर. येथील क्षेम. अधिक श्रावण वद ६ पर्यंत आपल्या दयेनें क्षेम असो. आपण दया करून बहुतां दिवसां पत्रीं परामर्श केला, यावरून बहुत संतोष जाहला. यावरून फुडें आमचें उर्जित आहे. चिरंजीव **गोपाळभटांस** राजश्री **माहाराजांस** भेटविलें आणि करजदारांसही ताकीद केली म्हणून लिहिलें, तरी सर्व अभिमान तुम्हांसच आहे. तुमचाच भरोशावर आलों आहों, तरी आमची लज्जा तुम्हांस आहे. मी त्याहावेसें काय आहे. परंतु सूचना लिहिली आहे. करजदारांशीं त्यांशीं तालुका नाहीं. माझें मजवर आहे. रुपया उगविल्यावर ठेवीत नाहीं. **हरपनाळीवर** दोन हजार होन ठेविले आहेत. ते चैत्रवैशाखांत आले तरी येतील. आणिखी अद्याप कोठें पैसा दिला नाहीं. या फुडें काय होईल तें पाहावें प्रस्तुत भक्षायार्चे मानसिक आहे.

सारांश, सर्व भरोसा तुमचा आहे. ज्याचा भरोसा होता, तो गेला. त्या मागें तुम्ही आहां. उचित असेल तें करा. कृपा कीजे हे विनंती.

हेंचि रा. **रामचंद्रपंतांस** नमस्कार लोभ असो देणें हे विनंती.

Krishnambhat Nawathe writes to Vaidya Brothers that he would pay his debt on receiving back the sum of Rs, 2000 advanced to some persons at Harapanalli. He showed his gratitude fot taking every care of Gopalbhat, his younger brother.

---

No. 48 श्री अ. श्रावण व० १२।१६६३
जुलै ता. २८,१७४१

शिक्का व मोर्तब पिंपळपानी
दुहेरी चौकोनी




दस्तक सरकार राजश्री **पंतसचीव** ता. कमावीसदारांनीं व चौकीदारांनीं, जकाती व रहदारी लोकांनीं व लोक किलेहाय व बाजे लोकांनीं व शिलेदारांनी महालनिहाय अहृद **सातारा** तहृत प्रांत **कोकण** सुहुर सन इसने आरबैन मया आलप राजश्री **बाळंभट वैद्य** सन्निध राजश्री **स्वामी** यांचे खासगत कोठीचे बैल सर ५० पनास बा.

---

१ परवाना. २ पासून. ३ पर्यंत.

रेवसेट घारुट हे हरयेके जागा जाऊन हरजिन्नस खरीदी फ्रोख्त करून सरसाल खेपा आणितील त्यांस सुखरूप जाऊं येऊं देणे. मार्गी कोण्ही मुजाहिम न होणे. जकातीचा तगादा न लावणे. छ. २५ जमादिलावल पा। हुजूर

( मोर्तब )




सुरमुद बार

This is a permit granted by Pant Sachiv to Balambhat ordering officers to give protection to his man Rew..het Gharut who with 50 bullocks is carrying purchased Goods from Satara to Konkan. It is to be noted Chimanaji Narayan used Shankaraji Narayan's seals.

---

No. 49 श्री श्रावण शु. ११।१६६३
ऑगस्ट ११,१७४१
जमायेवज
सुा इसने

खो राजश्री **बाळंभट व विस्वनाथभट वैद्य** कर्जे गु॥ हाये.

**प्रतापजी सोमवंशी** श्रावणमास।सुध ११ जमा दुकानीं रु. ७०० पैकीं कर्ज गिरत्यन जमा रु. ४८५ बाकी देणें.

आ॥ जमा २१५ रुपये

**वेकंटराऊ गंगाधर** मि॥ श्रावण सुध मास वद्य १४ कर्ज रु. ११०० पैकीं जमालेले. देणें रु. २६८≡

*The account shows that Pratapji Somavansi and Vyankatrao Gangadhar Hanmante had incurred debts from Vaidya Brothets.*

१ अव्वल.

---

No. 50 श्री श्रा. शु. १२।१६६३
ऑगस्ट १२,१७४१

श्रीमंत राजश्री **विस्वनाथभटजी वैद्य** स्वामीचे शेवसी.

विनंति सेवक **रामचंद्र गोपाळ** कृतानेक सां। नमस्कार विनंति. ता। श्रावण सुध **१२** पावेतों स्वामीचे कृपेकरून क्षेम आसो. यानंतर कांहीं कामाकाजाबदल **सातारियासीं** आलों आहों. श्रीमंत राजश्री **बाळंभटबावा** व मुलेंमाणसें समस्त **वाईस** सुखरूप

आहेत. रा **विसाजी बलाळ जोग** यांच्या पंधरा हजाराच्या दोन हुंड्या येथें केल्यात, त्या पावल्या. त्यांत लिहिलेत कीं, **फुणियासी** हुंडी दाखल होईल. त्या मितीस फुणियासी देणें. त्यास आमचे यैवज तेथें नाहीं. **सातारियाचा** रुा फुणियांत न्यावा तरी **दर** सेकडा दीड रुा बटा पडतो, याकरितां नेतां नये. त्याणें रुा आज पावेतों देणें राहिले आहेत. राजश्री **लक्ष्मण बलाळ,** फुणियासी रुा जमा करून द्यावे, यांजकरितां बावांनीं पाठविले आहेत. वरकड सविस्तर **जखापा** व राजश्री **नारोपंत** गेले आहेत, ते सांगतां विदित होईल. लोकांकडील यैवज वसूल होणें म्हणून वरचेवर आपलीं पत्रें येतात. **दामले** विजांतर जाहाले. **गणेशपंत** व **माहादाजीराम** व **महादाजी कमलाकर** तिघांनीं आमची बाकी दहा राहिली ती घ्यावी येसें जाहालें. मागील आज दोन वरशाचा **हिसेब** होणें तो तैसाच आहे. राजश्री **रत्नपारखी** याकडील यैन गुंता वारून घेतला. राजश्री **बाबूराव कोनेर** यांणीं आजपावेतों येक रुा दिला नाहीं. **परशराम नाा जोशी** याकडील गुंता वारून घेतला. **प्रतापराव सिलिंबकर** यांजकडील पेशजी बोली जाहाली होती त्या प्रों वारून घेतलें. खतें दिलीं. राजश्री **भिकाजी नाा रास्ते** याकडीलही गुंता वारला. वरकड कांहीं थोडा बहुत किरकोळी कोणाकडील गुंता उरकला. **केसो कृष्णा सेंबेकर** याजकडील तिसरी तकसीम यैवज आला. वरकड येणें आहे. दरबारचे वर्तमान तरी यथास्थित आहे. याउपरी फुणियास रुा देणें येविसी चिठी येकंदर न करणें. जर चिटी दिलीत, तरी हजारी पंधरा रुा देणें पडतील. आपणास सूचना लि आहे याउपरी आपण खावंद आहेत. राजश्री **प्रधानपंताकडील** यैवज येणें, तो अद्याप आला नाहीं. यैसें वर्तमान आहे. आपण धंदावंदा काय केला हें कलो येत नाहीं. त्यास सविस्तर लिहावें. घर तयार जाहालें. ओटीवरील किलच्या जाहाल्या. घरांतील होणें आहेत. वरकड वर्तमान येथांस्थित आसे. बहुत काय लिहिणें. कृपा आसो दीजे हे विनंति.

हो राजश्री **नाना** उभयेतांस साां नमस्कार. कृपा करीत आसावें. तुमचे घरीं मुलेंमाणसें सुखरूप आहेत हे विनंति.

हो **गणेश बलाल दामले** साां नमस्कार. आम्हांस येक मुसनाफ उत्तम व गेंद जोडी १ जरूर पाठऊन द्यावा हे विनंती.

Ramchandra Gopal Karkare writes from Satara to Vishwanathbhat who was at Naghur about the money transactions and collections from Visaji Ballal Jog, Ganeshpant, Mahadaji Ram Damle, Mahadaji Kamalakar, Ratnaparkhi, Baburao Koner, Parashram Naik Joshi, Prataprao Silimbkar, Bhikaji Naik Raste, Keso Krishna Sembekar and Pantapradhan. The house probably at Wai was complete.

---

१ वेगळे.

No. 51 श्री श्रावण व. १४।१६६३
ऑगस्ट २८,१७४१

हिसेब रा **वेंकटराव गंगाधर** सुा इसने आर्बैन मया आलफ

| बीा खत | | बीा खत | |
|---|---|---|---|
| ११०० | श्रावण वद्य १४ | ३०० | कार्तिक वद सप्तमी |
| १४६।॥· | व्याज दर २ प्रों इा ता चैत्र सुध ९ मुा माहे ७ रोज ७ | २४॥· | व्याज इा ता चैत्र सुध ५ मुा माहे ४ रोज १५ यो दर २ प्रमाणें रुा २७ वजा २।· |
| | ⌣——रुा १५९।- | | |
| | वंजा बारोत्रा १२॥· | | |
| | बाकी १४६।॥· | | बाकी |
| १२४६।॥· | | ३२४॥. | |

⌣———
१५७१॥·

⌣——— माघ वद्य १० चिठी **लक्ष्मण नाा केसकर** चैत्र वद्य पंचमीस द्यावें.
बांकी रुपये ४७१॥·
८२८।· हालीं दिल्हें
———
१३००

सदरहू खत माघ वद्य १० दुर्मति घेतलें असे
बाकी ———— ०

This is an account of Vyankatrao Gangadhar Hanamante with Vaidyas. He had taken money even in 1720 from Vaidyas as a loan ( see Vol. I, letter nos. 8 and 9 ).

---

No. 52 श्री भाद्रपद १६६३
सपटेंबर १७४१

राजश्रियाविराजित राजमान्ये राजश्री **बालंभटबावा** स्वामीचे सेवेसी.

पाो **गोविंद सामराज** व **रामचंद्र सामराज** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावलें. लिा कीं, राजश्री **विसाजीपंत जोग** यास रुपये ३००० तीन हजार देऊन पावलियाचें उत्तर पाठवणें, म्हणून राजश्री **भगवंतराम** पाा. त्यास प्रस्तुत येथें **गालेरांच्या** × × रुाची निकड जाली आहे, यांजकरितां दसरियापर्यंत स्वामींनीं कृपा करावी. **भगवंतराम** यास मनाचिटी पाठवावी. माहलीहून राजश्री **यादबा** नाा येणार आहेत, त्या समागमें यैवज येईल ते समई आपणांस यैवज रुपये तीन हजार आपणास प्रविष्ठ करूं. तूर्त मनाचिटी पाठवावी. आणखी सालमजकुरीं रसदेस यैवज मागावा, तो मागत नाहीं. त्यास येक मास दया करून मनाचिटी **भगवंतपंतांस** पाठवणें. त्यानें फारसी

खटपट मांडली आहे. त्याजला अगत्यें चिटी पाठविली (पा'). कृपा असो दिल्ही पा हे विनंती.

Balambhat Vaidya sent Bhagwantram to get Rs. 3000 from Govind Samaraj. But he was unable to pay and wanted a month's time when he would get money from Yadaba Naik.

---

No. 53 श्रीआई आदिपुरुष

४ रजब
भाद्रपद शु. ५।१६६३
सपटंबर ४,१७४१

राजश्री **विश्वनाथभट वैद्य** स्वामि गोसावी यांसी

सेवक **जगजीवन परशराम** नमस्कार. उपरी. सुा इसने आर्बैन मया आलफ. राजश्री **विष्णु विश्वनाथ पंडित** यासी रुपये ३००० तीन हजार तुम्हांकडील देविले **असेत. देणें.** जाणिजे छ ४ रजब हे विनंती.

Jagajivan Parshuram (Pratinidhi) asks Vishvanathbhat to pay Rs. three thousand to Vishnu Vishvanath Pandit.

---

No. 54 श्री

भाद्रपद शु. ७।१६६३
सपटंबर ६,१७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बालंभट व ताा राजश्री विस्वनाथभट वैद्य** स्वामि गोसावीं

सेवक **कोनेर राम** सांा नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल ताा भाद्रपद शुध ७ पर्यंत मुक्काम नजिक **श्रीरंगपटण.** येथें सेनेसह **येजमाना**समागमें समस्त सुखरूप आसो. विपेश. तुम्हांकडील वर्तमान पत्रें येऊन सांप्रत कलत नाहीं येसें न केलें पाहिजे. सदैव पत्र पाठऊन परामर्ष करीत जाणें. यानंतर इकडील वर्तमान पूर्वी पत्रीं लिहिलें आहे, त्यावरून साद्यंत श्रुत जाहलें असेल. पूर्वी आम्ही तेथें होतों, ते समई तुमचा व राजश्री **मल्हारपंत** यांचा हिसेब करून तुमच्या विच्यारें वारावें म्हणोन मारनिलेस **सातारियास** घेऊन आलों होतों, त्यास तुम्ही श्रीमंत राजश्री **स्वामी**समागमें स्वारीबरोबर गेलेत. तेव्हां मारनिलेस बाा घेऊन आलों. यांचे जबानीवरून तुमचा हिसेब ठीक केला आहे, तरी हलीं यास कितेक कामकाजमुळें **सतरसांस** पाठविले आहेत. तरी हिसेबाचा तगादा यास न लावणें. आम्ही आश्विनमासीं **सातारियास** आलियावरी तुमचा हिसेब वारून देतील. कांहीं चिंता न करणें. आम्ही येऊं तोंपर्यंत यासी कटकट कराल तर तुम्हांस आमची आण असे. कार्यास पाठविलें आहेत. तेथें राजश्रीना वाटेल बावाकडील मामलांची बोली निमित्य यास पाठविलें आहे. तुम्ही राा **मोरोपंतास** बोलावून यांच्या त्यांच्या विचारें मामलीयांची बोली करून घेणें. कांहीं

त्यास यैवज देविला आहे, तोही यांचे तुमचे विचारें देऊन मामले करून घेणें, तों आम्हीही लवकर येतों. भेटीनंतर सविस्तर वर्तमान कळूं येईल. दरबारचें कामकाज नित्य चितांत असूं देणें. बहुत काये लिहिणें हें विनंती.

Koner Ram writing from the camp near Shrirangpattan assures Balambhat and Vishwanathbhat Vaidya that he would pay off Malharpant's loan with interest upon his return to Satara next month, and he should not trouble Malharpant Barne sent there for securing Mamlat for which you should take him to Moropant.

---

No. 55 श्री भाद्रपद व. ४।१६६३
सपटंबर १७,१७४१

श्रीमंत राजश्री **बालंभट** व **विस्वनाथभट वैद्य** स्वामी गोसावी यासी :—

सेवक **महादाजी कृष्ण, हरि कृष्ण काणे** सां नमस्कार. विनंति सुा इसने आर्बैन मया व अलफ, आम्ही सरकार **नांदेडचा** मामला सरदेशमुखी वगैरे केला. त्यासी तुम्हांकडून निमे मामल्याची निशा करविली; परंतु राजश्री **भास्करपंताचा** कागद राजश्री **कोन्हेरपंत** यांसी आणून देऊं. सदरहु मुदती प्रा निशा तुमची करऊन आजिपासून तीन महिनेयांत देऊं. सके १६६३ दुर्मति संवत्सरे भाद्रपद वद्य चतुर्थी, हें लिा सही हे विनंति. मुदतीस निशा न करूं, तरी सावकारी निशा करून देऊं. हें लिा सही.

साक्ष

**धोंडो अनंत जोग** **मोरो बलाल दामले**
**गणो राम कोलटकर** **तुकोराम डिंगणकर**

Mahadaji Krishna and Hari Krishna Kane agree to farm the Sardeshmukhi, Sahotra and Babati of Nanded and request Balambhat and Vishvanathbhat to accept guarantee for payment of half the amount within 3 months.

---

No. 56 श्री १७ रजब
भाद्रपद व. ४।१६६३
सपटंबर १७,१७४१

श्रीमंत राजश्री **बालंभट** व **विस्वनाथभट** वैद्य स्वामी गोसावी यांसी

सेवक **महादाजी कृष्ण, हरी कृष्ण काणे** सा नमस्कार विनंती. सुा इसने आर्बैन मिया व अलफ. राजश्री **रामाजी ना वाकडे** यांजकडून मामला सरकार **नांदेड** येथील **सरदेशमुखी** व **साहोत्रा** व **बाबतीं**चा मामला मक्ता केला, त्याजपैकीं रसद खत आलाहिदा दिल्हें असे. बाकी बाकी रुपये बीतां

पौश सुध ११ रुये चैत्र सुध ११ रुपये
७७५० ८०००

येकूण पंधरा हजार सातसे पनास. सदरहु मुदतीप्रों देऊं. मुदतीस पुढें राहिले (तर) व्याज दरमहा दरसदें रुा २॥ अडीच प्रों देऊं. सदरहू बाकीची मनोति दरसदें रुा ५ पांच कबूल केले आहेत. हे सदरहू बाकीचे मितीप्रमाणें देऊं. सके १६६३ दुर्मति संवत्छरे भाद्रपद वद्य ४ छ १७ रजबु बीा। **महादाजी कृष्ण काणे.** लिा सही.

साक्ष

लिा **मोरो बलाळ दामले १** — **धोंडो अनंत जोग १**
**गणेराम कोलटकर १** — **तुकाराम डिंगणकर**

---

No. 57 श्री भाद्रपद व. ५ ते अमावास्या १६६३
सप्टें. ८ ते १८,१७४१

याद येणें निा **सेनासाहेब सुभा**

७३० चिटी पोतांपैकीं. पाच लक्षपैकीं
५०० **रामदास परळी**
९००० भरणा **सरलष्कर**पैकीं
  ४००० पेसजी रुपये ६००० पैकीं
  ५००० हालीं **सरलष्कर** रुा २५००० पो
  ———
  ९०००
२०० व्याज
  १८० कार्तिक वद १३ ता पौ शुध १३ यो माहे १॥ रुा ६००० पो दर २ प्रा
  २० रुा ४००० पौ.
  ———
  २००
———
१०४३०

**राघोपंत राजवाडे** याचा देणें.

३०० पालखीचे यैवजीं
  १०० साज पालखीपैकीं येणें
  २०० रोजमरा भोई दोन माहा २
  ———
  ३००

These entries of payments are found in the monthly accounts of Vaidyas for Bhadrapada from which the date of the paper is fixed.

---

No. 58 श्री नकल

भाद्रपद वद ७।१६६३
सपटंबर २०,१७४१

राजश्री **रामाजी नाईक वाकडे** गोसावी यासी.

आश्रित **पुरुषोत्तम भट सेवडे** आसीरवाद विनंती. उपरी राजश्री **माहादाजी कृष्ण** व **हरी कृष्ण काणे** यांणीं तुम्हांकडून सरकार **नांदेड** येथील बाबती वगैरेंचा इजारा केला. पैकीं रसद परभारीं मानिलें यांणीं दिली. बाकी बाकी आम्ही भरली आहे. रुपये १५७५० पंधरा हजार सातशे पन्नास येणें प्रों तुम्हांस देऊं. बीा.

७७५० माघ सुद १ प्रतिपदा
८००० वैशाख सुद १ प्रतिपदा शके १६६४

१५७५०

एकून पंधरा हजार सातसे पनास सदरहू मुदतीप्रों तुम्हांस देऊं. सालदरम्यानें मामलीयासी घालमेल जाहली तरी रुपया ठेवणार नाहीं. मिति शके १६६३ दुर्मती सवछरे

भाद्रपद वदी ७. + हें लिहिलें सही.

सदरहूस उगवणी **बाळंभट व विश्वनाथभट** वैद्य. + सदरहु मुदतीस रुा मारनिले देतील, न देत तरी आपण देऊं. सदरहु मुदतीला लिहिल्याप्रों देऊं.

Purushottambhat Shewade writes to Ramaji Naik Wakade that he will pay Rs. 15,750 on account of the revenue of Babati of Nanded before next Vaishakha, on any account, though the revenue of Nanded is not recovered. The Vaidyas have stood surety for it.

---

No. 59 श्रीशंकर भाद्रपद वद ७।१६६३
सपटंबर २०,१७४१

वेदमूर्ती राजश्री **पुरुषोत्तम सेवडे** स्वामी गोसावी यासी.

पों **बाळंभट** व **विस्वनाथभट** वैद्य. कृतानेक नमस्कार विनंती उपरी. राजश्री **महादाजी कृष्ण** व **हरी कृष्ण काणे** यांणीं राजश्री **रामाजी नाईक वाकडे** याकडून साा **नांदेड** येथील बाबती व सरदेशमुखी व साहोत्रियाचा मामला केला आहे. त्याची बाकी आम्ही कबूल केली आहे. रुा १५७५० पावणेसोळा हजार देणें, ते येणेंप्रों रुपये तुम्हांस देऊं बीा.

७७५० माघ सुध १ प्रतिपदा
८००० वैशाख सुध प्रतिपदा शके १६६४ दुंदुभी सवछरे

१५७५०

---

टीप :—रामदासस्वामी म्हणजे चाफळचे त्या वेळचे मठाधिपति श्री. **लक्ष्मणबावा** (नाम्रा) असावे. हे बावा, श्रीसमर्थांचे बंधू गंगाधरबावा यांचे नातू होत.

एकूण पावणेसोला हजार रुपये मुदतीप्रों आपण तुम्हांस देऊं. शक १६६३ दुर्मती संवछरे भाद्रपद वद्य सप्तमी सुहूर सन इसने आरबैन मया व आलफ. सदरहूप्रों बाकी-चिटी तुम्हांकडून रामाजी ना वाकडे यासी देविली आहे. तरी मुदती प्रो रा तुम्हांस

+

देऊं. हें लिहिलें सई हे विनंती.

Vaidya Brothers undertake to pay Babati, Sardeshmukhi and Sahotra of Nanded, if not paid by Kane Brothers, to Wakade for Purushottumbhat Shewade. The transations, being intricate, are worth studying.

---

No. 60

भाद्रपद १६६३
सपटंबर १७४१

श्री+राजाशाहूप्रा

श्रीमन्माहाराज क्षत्रियकुलावतंस राजश्री छत्रपतीसाहेबांचे सेवेसी.

सेवेसी. विज्ञापना. उपरी येथील क्षेम तागायेत भाद्रपदपर्यंत साहेबांचे कृपावलोकनें करून सेवकार्चे वर्तमान कुशल असे. विशेष. सेवकें वारंवार उदंड पाल्हाळ अनुपति, आपला सर्वस्व अपहार केला, कर्जदार जालों, यैसें सेवकें लिहिलें. अर्ज केला. तथापि महाराजास खरें सत्य भासत नाहीं. आम्ही ब्राह्मण, लोकीं इलाज काय करावा ! दरबारीं राज्यांत बेदाद जाहाली. सत्यधर्म, राजनीति, कदीम पाया मोडला. आम्ही लोकीं दुःख कोणाजवळीं सांगावें ! अर्ज कोणाजवळीं करावा ? ही आज्ञा करावी. येकमुखी राज्य जाहालें. महाराज थोर, वडील, समर्थ, सर्वांचा प्रतिपाल करीत आहेत. वेडे, बागडे, पंगु, आदिकरून निकामी आहेत, त्यांचा सांभाल महाराजांनीं केला आहे. अन्नवस्त्र देऊन आदर होत आहे, म्हणून माणूसमात्र धावोन महाराजासंनिध येत आहेत. आम्ही पांच पिढ्यांचे कदीम जुने ब्राह्मण, चाकर, सेवेला आहों. आमची सत्ता महाराजांचे पाया-जवली आहे. येकवेळ संनिध पायाजवळीं येतों. चिरंजीव मुलांस अन्नवस्त्र द्यावें, कर्ज फेडावें, स्थापना करावी. नाहीं तरी डोईस राख घालून महाराजांचें नांव घेत देशांतरें जाऊं. यैसा अर्ज आहे. सीमा जाली. सविस्तर राजश्री सिवाजीपंत पाठविलें आहेत, अर्ज विनंती करितां

+

श्रुत होईल. राजनीति, राजधर्म, वडिलवडिलांची परंपरा, कदीमपाया (यांचा) शोध करावा आणि आमची दाद करून सदयें चित्तें अन्नवस्त्र देऊन उर्जित करावें. महाराजांचे राज्यांत वडिलवडिलांनीं चोरी, चाहाडी, हरामखोरी कांहीं केली नाहीं. निष्ठेनें, मर्यादेनें चाकरी केली आहे. उतलो माजलो नाहीं. देवब्राह्मणाचें घर, साहेबाचे नेवाजीस आहे. उपेक्षा न करितां दया करून सांभाळ करावा. ईश्वरास हे गोष्ट मान्य आहे. परमेश्वर उत्तरोत्तर कल्याण करील. महाराजांनीं अवकृपा केली, उदास धरिले, पायानें लोटोन दिलें तर पृथ्वींत अपकीर्ति होईल. आम्ही ब्राह्मण आहों. महाराजांचें नांव सांगत मुलकांवर देशांतरें

---

१ दारिद्य. २ आश्रित, मेहेरबानींतले

जाऊं. आमचा वगवसिला दुसरा दरबारीं कोणी नाहीं. अर्ज करणार कोणी नाहीं. **महाराजास** करुणा, दया, माया आली पाहिजे. सत्यंजय यैसें आहे. आपलें बिरुद राखावें हे विज्ञापना, **लक्षशा.**

This letter is written by Bhagwantrao Amatya to Shahu, describing his woeful condition in flowery language. The Marathi paper is worth reading.

---

No. 61

अश्विन शु॥ १६६३
सपटंबर १,१७४१

श्री+राजा **शाहूप्रसंन**

सेवेसी विज्ञापना. अर्जी **महाराज.** आमचे देव, धनी, कल्पवृक्ष, मूलपुरुष, मायेबाप. आम्ही लेकरें. वडील परंपरागत वंशपरंपरेचीं लाविलीं झाडें, यैसें असोन उपेक्षा करून पायानें लोटव्हे यैसें नाहीं. अन्नवस्त्र, हुदा, सरंजाम देऊन अभयवचनपत्रें श्वहस्ताक्षरें दिलीं आहेत, त्याप्रों सदयें चित्तें कृपा करून चालवावें. ॥ दीनबंधु, ब्रीद भलें जरी तुवां बांधिलें, तव्हि कां आम्हां उपेक्षिलें ! जळ बुडवी पाषाण, जळकाष्टें तारी पूर्ण, आपण वाढविलें म्हणउनी ॥ उदकीं हा अभिमान, तूं तरी जगजीवन, आम्ही भावें आलों शरण. ॥ यैसा अर्थ आहे. आपल्या बिरुदास अन्यथा न करावें. वरकड सर्वांस राज्यांत महाराजासंनिध पोट भरावयास जागा आहे आणि आम्हांस ठाव नाहीं ! तेव्हां दिनानाथ, दीनबंधू या **येशकीर्तीस लोकोत्तर हासें होतें.** महाराजांचे पायाचे वतनदार, कदीम, ब्राह्मण सेवक आहों. वतन उछेदन करावा. दत्तं श्वयं, हारिणा दिलें, तें परतून न घ्यावें. हजार अन्यायें असिलेवर महाराजांचे मुद्रांकित आहों. **संभाजी पडवळ** अर्ज करितां विदित होईल. हे विज्ञापना, **लक्षशा.**

The letter describes in strong language how Bhagawantrao is reduced to poverty on account of his Vatan being stopped by Shahu. The whole handwriting of this letter is of Bhagwantrao.

---

No. 62

आश्विनशुद्ध १६६३
सपटेंबर १७४१

श्री+राजा**शाहूप्रां**

सेवेसी विज्ञापना. उपरी येथील वर्तमान. तागायेत अश्विन शुध पर्यंत माहाराजांचे कृपादृष्टी करून सेवकाचें वृत येथास्थित असे विशेष. साहेबी कृपाळू होऊन रा **संभाजी पंडवळ** व रा **सिवाजीपंत** या बराबर आज्ञापत्र सादर जाहालें. मस्तकीं वंदून सनाथजालों.
+
**महाराज** आमचे देव, धणी, वडील, मायेबाप. याजस्तव वारंवार विनंतीपत्रें लिहून अर्जे करीत असतां, ब्राह्मण लोकांची, आमची दाद जेव्हां नव्हे. (तेव्हां) हिंदुपत व दीनबंधू या बिरुदास आपकीर्ति दिसून येती. आम्हा ब्राह्मण लोकांची उपेक्षा महाराजांनीं करावी, कदीम[1]

---

1 पुरातन, प्राचीन

आपले परंपरेचीं लावणीचीं झाडें मोडावीं येसें नाहीं. **महाराज** कल्पवृक्ष आहेत. चिंतिलें फळ द्यावें. निजभक्त, सेवक शरणागत आहेत, यांचा धावा **महाराजानीं** करावा. संकट वारावें, अभयेवचन सत्य करावें. दारिद्यदुख दूर करावें. अनमान असेल तर तैसीच आज्ञा करावी. येक वेळ दर्शन घेऊन श्रीयात्रेस जाऊं. मानिले अर्ज करितां विदित होईल. हे विज्ञापना **लक्षशा**.

Bhagwantrao writes to Shahu Maharaja of his woeful condition as regards money and says in despair that he intends to go to Kashi if his personal visit proves useless.

---

No. 63 श्री अश्विन शुध ५।१६६३
आक्टोबर ३,१७४१

राजश्री **भिकाजीराव विचारे** गोसावी यासि.

छ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री **महादाजी कृष्ण काने** रामराम. उपरी येथील कुशल ता। आश्वीन सुध पंचमी जाणौन स्वकीये लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष बहुत दिवस तुम्हांकडील वर्तमान कळत नव्हतें, त्यास हालीं राजश्री **नारोपंत** आले, त्यांणीं सविस्तर वर्तमान सांगितलें. त्यावरून बहुत समाधान जाहालें. यानंतर श्री**आदितेश्वराचें देवालय** बांधावयाचा बेत आमचा आहे, त्यास पेशजी राजश्री **विश्वनाथभट वैद्य** यास लिहिलें होतें. त्यावरून याहीं किरिस्तावाचे पदरीं पैका घालून काम लाविलें आहे. त्यास तुम्ही तेथें आहा तरी देवालय सिध होय तें केलें पाहिजे. श्रीदेवलास लाकडाचा सरंजाम पाहिजे, त्यास खांब व पाट्या यांचा सरंजाम गावांतून व आणखी हरकोठें तलास करून दिल्हा पाहिजे. हें काम तुमचें आहे. आम्ही सर्वप्रकारें तुमचे पदरीचे असो. देवळास जो सरंजाम पाहिजे तो करून घ्यावा, बहुत ल्याहावें येसा अर्थ नाहीं. सूचनार्थ लिहिलें आहे. तुम्हा कारण तिवेंट व पासोडी ताडपत्री १ येकूण सणगें दोन पाठविलीं आहेत, ते
+
घेऊन पावलियाचें उतर पाठवणें. लिहिल्याप्रों कार्या करून सत्वर काम करणें. बहुत काये लिहिणें हे विनंती.

Mahadaji Krishna Kane undertakes to build a temple of Adityeshwar at Varavde near Jayagad; the work was to be done by Christian artizans, as probably all that class of workers was converted by the Potuguese. He requests Vichare to help in this work of building the .temple by procuring wood etc.

---

१ पागोटें. २ रंगाचा पाढऱ्या चौकटीचा शेला. पाट्या–फळया.

No. 64 श्री १६६३
१७४१

श्रीमंत राजश्री **बालंभट वैद्य** स्वामीचे सेवेसी

सेवसी **प्रतापजी हैबतराऊ सिलिमकर** देशमुख ता॥ **गुंजणमावळ** सा॥ दंडवत विज्ञापना. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन आज्ञा केली पाहिजे. यानंतर **संभाजी कदम** याजबरोबर आज्ञापत्र पाठविलें तेथें रुपयाविशई कितेक विशर्दे पत्र लिहिलेत. कळलें. येसी यास अगोटीचे दिवस. येणेकरून सर्व गोष्टी प्रतिकूल व चिरंजीव राजश्री **कानोजीराऊ** लष्करास गेले ते अद्याप आले नाहींत, यास्तव च्यातुर्मास जालियावर आम्ही सेवसी येऊन स्वामीच्या देणियाचा भाग वारून. तोंपर्यंत च्यार महिने आम्हांवर दया केलियानें सेवकाचा समर्ये रक्षिला येसें होतें. याकरितां स्वामीचे सेवेसी विनंतिपत्र लिहिलें आहे व आम्हांवर जमानिक पडली, येणेंकरून सेवकाचें साहित्य बहुतसें जालें तें सेवेसी लिहितां पुरवत नाहीं. दरशनानंतर सेवेसी निवेदन होईल व आमचें वर्तमान **संभाजी कदम** सांगतां विदित होईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

---

जमानिक—जबाबदारी.

Pratapji Haibatrao Silimkar of Prant Gunjanmaval informs Balambhat Vaidya that he would arrange to pay the debt after the return of his son Kanojirao from the war, who is expected to return after Kartik.

---

No. 65 श्री १६६३
१७४१

श्रीमंत राजश्री **बालंभट** व **विस्वनाथभटबावा** स्वामीचे सेवेसी

सेवक **प्रतापराऊ सिलिंबकर** देशमुख ता॥ **गुंजणमावळ** रामराम विनंतिउपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन करावयासि आज्ञा केली पाहिजे. विशेष तुम्ही **अकलमहमद** याजबरोबर पैकियाविसी कागद पाठविला, तो पावला, लिहिला अर्थ कलो आला. **अकलमहमद** याजबरोबर रुपये ५० पनास पाठविले आहेत, व बाकी रु॥ १५० राहिले ते अमवस्या जाहलियावर पाठऊं. पनास रुपये घेणें. वारंवार मसाला करावा येसें नाहीं. पैका जो मिळे तो पाठऊन देऊं. बहुत काये लिहिणें. कृपा लोभ असो दीजे. सेवेसी श्रुत होये हे विनंती.

वाबदलाचें काम विल्हें लागत नाहीं. तरी आपण तेथें आहेत विल्हेस लाविले पाहिजे. विशेष ल्याहावें तरी आपण सूज्ञ आहे. हे विनंती.

Pratapji Silimkar of Bhor State pays Rs. 50 with Akalmahamad (Vaidya's servant).

---

No. 66

श्री

कार्तिक शु. ७।१६६३
नोवेंबर ४,१७४१

खा। राजश्री वैद्य
इा आ। ता। अखेर

सु। इसने

खर्च

रा। वाराणसी बा। सकुबाई
कार्तिक मास सु। ७
५०० सु। ७ हुंडी
पुरुशोतमभट नि।
२१०।= सु। ८ रा। वारा-
णसीस
११० ब्राह्मण
१००।= रोख चा।

२१०।=

७१०।=

खा–खाजगत रा–रवाना
आ–अव्वलसाल

Private account of Vaidya Brothers containing the statement of money-given to Sakhubai, the widow of Bhaskarbhat when she went to Kashi.

---

No. 67

श्री

कार्तिक शु। ८।१६६३
नवंबर ५,१७४१

खा। रा. वैद्य
इा अवलसाल ता। अखेर

सु। इसने

खर्च

मल्हारजी सावंत
कार्तिक रुये.
२५ वद ३ दुकान पै.

२५

रुये–रुपये

विस्वनाथभट वैद्य

| | | | |
|---|---|---|---|
| | कार्तिक मास रुये. | | मार्गसीर मास रुये. |
| ५००० | सु। ८ आदा अंतोबा ना। भिडे बा। सरलकर बो। भो। | ४००० | सु। ६ चिटी रघोजी भोसले रा: २०००० पैकीं रुये. |
| ५००० | | ४००० | |

This account gives transactions of Vaidyas with two important persons Antoba Bhide & Raghuji Bhosle.

No. 68 श्री

कार्तिक व० १४।१६६३
नोव्हेंबर १५,१७४१ ते
आषाढ शु. १।१६७२
जून २३,१७५० अखेर

हिसेब राजश्री **रघूजी भोसले** सेनासाहेब सुभा सुभा
इहिदे खमसैन मया आलफ ता। प्रमोद सवछरे जेष्ठअखेर

| | यैन मुदल | व्याज दर २ |
|---|---|---|
| शके १६६३ दुर्मती सवछरे कार्तिक वद्य ४ ता। मु।। माहे १०७८१२ | १०००० | २०६७९ |
| शके १६६६ रक्ताक्षी सवछरे वैशाख सुध १२ ता। मु।। माहे ७३८१९ | २५००० | १८८१६॥ |
| शके १६६८ क्षय सवछर आस्वीन सु।। ११ ता। मु।। माहे ४४८१८ | ५००० | ४४६० |
| कंठी मोर्त्ये सरसुधां सन सबा | ४२०० | ० |
| शके १६६९ प्रभव मागसीर वद्य ३ मु।। ३०८१३ | ५००० | ३०४३ |
| शके १६६९ प्रभव सवछरे मार्गसीर वद्य १ मु।। माहे ता। मु।। माहे ३०८१५ | १३०५९॥ | ७९६६॥ |
| शके १६६९ प्रभव फलगुन वद्य १ ता। मु।। माहे २७॥ | ८००० | ४४०० |
| सन सबा **प्रतिनिधि** | ६००० | ० |
| शके १६७२ प्रमोद सवछर आषाढ सु। १ यैवज नि। **विसाजी बलाळ जोग** | १०००० | ० |
| | ८६२५९॥ | ५९३६५ |

| | यैन मुदल | व्याज दर २ |
|---|---|---|
| भरणा **उटनूर चादे** रुक्ताक्षी सवछरे आषाढ सु।। १५ मु।। माहे ७१॥ | १००० | १४३० |
| शके १६६८ क्षय सवछर कार्तिक वद्य ७ मु।। माहे ४३८९ २०४६६ पैकीं सूट २०४६ बाकी | १८४२० | १५९५०॥= |
| शके १६६८ क्षय माघ सु। १० ता। मु।। माहे ४०८२० १३५०० सूट १३५० बाकी | १३१५० | ९८८२ |

| | | |
|---|---|---|
| शके १६७१ शुक्ल सवछर कार्तिक सु १ रा १०००० पैकीं आदा रुपये ४३०० वजा हुंडणावळ बाकी रा १६६ बाकी ता मुा माहे ८ | ४१३४ | ६६१॥ |
| शके १६७१ शुक्ल पौस्य १ ता मुा माहे ६ | ३००० | ३६० |
| जेष्ठ सु १ प्रमोद ता मुदत माहे १ | १५०० | ३० |
| शके १६६६ रक्ताक्षी आषाढ सु १ ता मुा माहे ७२ | ५००० | ७२०० |
| मा तुळजोराम बा प्रतिनिधि सन सबा | ६००० | ० |
| शके १६७१ शुक्ल पौष्य १ मोहरा ता मुा माहे ६ | ८४० | १००॥= |
| | ५२०४४ | ३५६१५ |

बाकी इहिदे खमसैन प्रमोद आषाढ सु १
यैा मुदल — व्याज
३४२१५॥ — २३७५०
वजाबारोत्रा रुये ११७९।

बाकी रुये २१७७०॥।

५५९८६।

This is an account of the sums of money paid to Raghuji Bhosle from 15th November 1741 to 23rd June 1750 and the sums recoverd from time to time in the intermediate period by Vaidyas and showing in the end the balance due from him after calculating the interest in both ways. This contains the sums of Rs. 10,000 and 25,000 paid to Bhosle for the release of Chandasaheb which took place on 13th April 1744. There is also in the papers a list of 7 conveyance deeds executed by Raghuji on account of the loan of these sums.

No. 69 श्री का. व. १३।१६६३ नोव्हेंबर २५,१७४१

शिक्का मोर्तब
अष्टकोनी दुहेरी

( शिक्यांत जशा ओळी व अक्षरें आहेत त्याप्रों दिल्ीं आहेत )

७ श्री ०
श्री शाहुराज
पदांभोजिभ्रम
रायित चेतसा बिं
बात्मजस्य मुद्रै
षा राघवस्य
विराजते

आज्ञापत्र सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्यराजश्री **रघोजी भोसले** सेनासाहेब सुभा ता। मोकदमांनी ता। **च्यार ठाणे पा। येदलाबाद** सुभा इसने आर्बैन मया अलफ. ता। मजकूर पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून सालमजकुरीं राजश्री **विस्वनाथ रघुनाथ** यांसी पालखीचे बेगमीबद्दल मुकासा दिल्हा असे. तरी तुम्ही यांसि रुजू होऊन ता। मजकूरचा माल व सायेर व जकात, कुलबाब, कुलकानू मुकासबाबेचा वसूल मारानिलेकडे सुरलित देणें. जाणीजे छ २७ रमजान मोर्तब सुदं.

मोर्तब
सुद

An order of Senadhurandhar, Raghuji Bhosle, to Mokadum, informing that Vishvanathbhat is granted the Mokasa of Charthane for covering the expenses of a Palanquin (पालखी) and also other haks.

---

No. 70 श्री का. व. १३।१६६३ नोव्हेंबर २५,१७४१

अष्टकोनी दुहेरी (रघूजीचा) सिक्का व मोर्तब

छ

मा। अनाम देशमुख व देशपांडिये पा। **येदलाबाद** यांसि

**रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा सुमाइसने आर्बैन मया अलफ ता। **च्यारठाणें** पा। मजकूर पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून साल मजकुरीं राजश्री **विस्वनाथ रघुनाथ** यांसि पालखीचे बेगमीबदल मुकासा दिल्हा असे. तरी तुम्ही यांसि रुजू होऊन ता। मज-

कूरचा माल व सायेर व जकात, कुलबाब, कुलकानू, मुकास बाबेचा वसूल मारनिलेकडे सुरलित देणें. जाणीजे छ २७ रमजान मोर्तब सुद

बार (मोर्तब सुद)

An Order of Raghuji Bhosle to Deshmukhs and Deshpandes of Yedalabad Paragana, informing, as stated in No. 69.

---

No. 71 — श्री — कार्तिक व. १४।१६६३

सिका असे — नोवेंबर २६,१७४१

नकल बमोजिब असल

कर्जरोखा शक १६६३ दुर्मती नाम सवत्छरे कार्तिक वद्य १४ चतुर्दसी तदिने धनको नाम राजश्री **बालंभट** व **विस्वनाथभट** वैद्य यांसि. रिणकोनाम **रघोजी भोसले** सेनासाहेब सुभा. आम्ही तुम्हापासून कर्ज घेतलें मुदल रुपये १०००० दहा हजार यासी व्याज दरमाहा दरसदे रुा २ दोनचा करार केला आसे. व्याज व मुदल, जाले मुदतींचे हिसेबसुधां वारून देऊं. हें खत लिहिलें सही मोर्तब असे.

This is a bond of debt of Rs. 10000 with interest, executed by Raghuji in favour of Vaidya brothers.

---

No. 72 — श्री — मार्गशीर्ष शुध १।१६६३

नोवेंबर २७,१७४१

राजश्रियाविराजित राजश्री **बालंभट वैद्य** स्वामी गोसावी यास.

पोष्य **बापूजी गणेश जोग** साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुषल ता मार्गसीर सुध प्रतिपदापावेतों समस्त सुखरूप असो. स्वकियें खुसाल लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेष येंदा सेतेंभातें, ये प्रांतींचीं मेलीं. लोक तजावजा जाले आहेत. आमचे गावींचीं तो अगदीं मेलीं. तशामध्यें खारीचीं सेतें तो कापावीं न लागत, यैसी जालीं. आमची खासगत होती, तें गवत मात्र जमा करून ठेविलें आहे. दाणा निर्माण होणार नाहीं. अर्धेलीच्या खारी आहेत, त्या कापीत नाहीं. लोक म्हणतात कीं, गवता-करितां कापा म्हणाल तरी कापूं. भात होईल तें सारेंच तुम्ही घ्या, यैसें म्हणतात; परंतु अद्याप कोणी कापीत नाहीं. आपणास कलावें, म्हणून लिहिलें आहे. तांदुलाविसीं पत्र पाठविलें, तरी प्रस्तुत श्राद्दांचे दिवस, घरास शाकार भातेण नाहीं. याकरितां कोठें तांबेटी काढावी लागत्यें. याजकरिता आठ दिवस लागतील. पंधरा दिवसा तांदूल करून रवाना करितों. कळावें म्हणून लिा आहे. बहुत काय लिा लोभ असो दीजे हे विनंती.

**हो पो गोविंद हरी जोग** साष्टांग नमस्कार विनंती. आपण दया करून पांघरावयास सकलाद दिली होती, परंतु **कृष्णंभट काले** यांच्यानें वोझें न ये म्हणून **भट** सांगत होते, यैसी यासी हलीं वाणी **संदखोलचा** गेला आहे. याजपासी दिली तरी आम्हास पोचेल.

बहुत ल्याहावें, (सें : हीं.) सर्व प्रकारें भरवसा स्वामीचा आहे. तेथें फार काय ल्याहावें. कृपा निरंतर असो दिला पाहिजे हे विनंती.

Bapuji Ganesh Jog of Nandiwada describes to Balambhat Vaidya the disappointing condition of crops in the Konkan, the season being unfavourable. Govind Hari Jog requests to send the woollen garment which, Krishnambhat Kale, owing to much luggage, did not bring, with the Sankhol merchant who has gone to Satara side.

---

No. 73 श्री मार्ग. शु. ११।१६६३
नवंबर २७,१७४१

हिसेब राजश्री **संकराजी प्रभू** दि **राणोजी** भो सुहूर सन इसने अर्बैन मयाआलफ

जमा रुये.

५० यैा खत रौद्र कार्तिक २

१२॥। व्याज ता मार्गसीर्ष सुध १

मु माहे दुर्मती सवछेरे माहे

१३ यैन माहा

१ श्रावण अधिक

---

१४

दरसदे रुा २ प्रों दरमहा

रुा १ प्रों रुा १४, वजा बारोत्रा

रुा १।, बाकी

---

६२॥।

———————रा **गणेशपंत दामले**

मिती मार्गसीर्ष सुध १ दुर्मति. रुपये ५०

बाकी येणें रुपये १२॥।

———————माघ सुध ८ जमा १२ दुकानीं असे.

बाकी रुपये ०॥।०

सोड

बाकी ०

An account of money transactions between Ranoji Bhosale's agent, Shankraji Prabhu and Vishwanathbhat.

---

१ एक प्रकारचें शाकारण्यास उपयोगी गवत.

No. 74

श्री

मार्ग. शु. ५।१६६३
डिसेंबर १,१७४१
सुा इसने

२ खाा राा वैद्य
खर्च खेरीज मुाा राा विस्व-
नाथभट वैद्य

मार्गसीर्ष मास

| | | | |
|---|---|---|---|
| ८=। | सुध ५ मिठाई | ५।।।≡ | सुध ७ राा देहूर गुा कुसाजी |
| २२ | सुध ८ मोती कंठीस | | |
| २।।= | वद्य ३ न्याहाली | ३।। | सुध १५ ताा।१ राा देहूर गुा गिरी |
| ८।। | वद्य ४ न्याहाली सिलई | | |
| १ | वद्य ११ जोडा पायपोसाचा | ९।≡ | |
| | | ३ | सुध ९ ताा वद्य ८ औषधें गुा नारो अनंत मोघम आणविलीं |
| २५।।।-।।। | | | |

पौष मास (right column heading), फाल्गून मास (right column heading)

३

| | | | |
|---|---|---|---|
| | चैत्र मास | | वैशाख मास |
| ।।।· | सुध ५ ताा ८ पायपोस जोडा. | ८= | सुध १ ताा २ मुांा नेरे गुा मिराखान |
| १ | वद्य ६ ताा ११ जोडा पायपोस | | |
| १।।।· | | ८= | |

This is an extrct of a ledger of Vishwanathbhat, giving things included in Ksherij Mushahira; ordinarily Mushahira means remuneration. Kherij Mushahira includes also things, such as pearls, sweetmeats, bedding, etc. This also gives a hault of Vishwanathbhat at Nere.

---

No. 75

श्री

छ ११ सवाल.
मार्गसीर शु. १३।१६६३
डिसेंबर ९,१७४१

राजश्री आबाजी रघुनाथ कमाविसदार का खेडबारें गोसावी यांसि.

छ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो बसवंत राऊ खासखेल रामराम सुहुरसन इसने आर्बैन मयाअलफ. राजश्री बालंभट वैद्य याचे तांदूळ सिंहगडाखालें

१ खासगत. २ लहान गादी.

आहेत. ते आणावे लागतात. याबदल पेठ सिवापूर येथील वाण्याचे बैल सुमार ५० पनास, भाडें करून देऊन, बैल तांदूळ भरून आणितील ते गोष्टी करणें. उजूर न करणें. रास्ती भाडें घेणें. जाणिजे, छ. ११ सवाल. तांदूळ सिंहगडाखालून पेठेंत आणितील, तेथून भाडेच्या बैलावरी तांदूळ भरून रवाना करणें. जाणिजे बहुत काये लिहिणें.




शिक्का व मोर्तब
अष्टकोनी दुहेरी




Baswantrao Khaskhel orders Abaji Raghunath, Kamavisdar of Khedebare, to arrange to take rice to Balambhat Vaidya by engaging oxen with resonable rent to carry the loads.

---

No. 76 श्री मार्ग. शु. १५।१६६३
डिसें. ११,१७४१
सुा इसने

खाा राजश्री वैद्य
इाा अवलसाल ताा अखेर.
खर्च रुये

परवानगी राजश्री स्वामी

| | मार्गसीर मास | | पोष मास रुये |
|---|---|---|---|
| १० | सुध १५ आदा रामाजी अनंत पाा आंगठी भटजी दुकान पैकीं | २ | खंडोजी भोई रुये दुकान पैकीं |
| | | ८ | येमाजी भोई दुकान पैकीं |
| ० | लग | १ | बाजी खिजमतगार दिा रत्नाकरपंत रुये |
| १० | | ११ | |

गंगाधर परशराम सोमण चाकर दिा राा येमाजीपंत याजपासून सिकारींत राा विस्वनाथभट वैद्य यांनीं घेतले रुा ४॥· पैकीं आदा वैशाख वद्य ३० रुये ४.

This Khata named Parawangi Rajashri Swami is peculiar and requires explanation. The meaning of दिा is very comprehensive. It means 'on behalf of', 'for'. It seems Vishwanathbhat was fond of hunting.

---

No. 77

श्री

१५ सवाल
मार्ग. व. २।१६६३
डिसें. १३,१७४१

राजश्री **महादाजीपंत काणे** दाजी गोसावी यासि.

छ

अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री **भिकाजीराव विचारे** कृतानेक रामराम विनंति, उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत गेले पाहिजे. विशेष तुम्हांकडून बहुत दिवस वर्तमान कळों येत नाहीं. तरी स्नेहाचे जागा उचित नसे. आपण **श्रीआदित्येश्वर मौजे वरवडे** येथें श्रीचे देवलाचें काम नवें लाविलें, त्यास देवल मुस्तेद जाहालें. देवलाची पापडी बांधावयाची आहे व पोवलही नवी बांधावयाची आहे. त्यास किरिस्ताव आपणाकडेस **नरसोजी** व **बस्तोजी किरिस्ताव** दोघेजण रवाना केले आहेत. तरी पांपडी व पोवल दोन कामें होणें त्यांस किरिस्तावांची बेगमी करून त्यांस पाठवून द्यावें, म्हणजे काम लवकरच होईल. तुम्हाकडून कोणी माणस येईल, म्हणून मार्ग लक्षित होतों, परंतु माणस आलें नाहीं. याजकरितां हालीं दोघेजण किरिस्ताव आपणाकडेस पाठविले आहेत. लाकूडकाम तुम्ही मुस्तेद कोठें केलेंत आहा, तें लेहून पाठवावें, नाहीं तरी येथें आम्ही खालील चवकाचें साहित्या आम्ही करूं. परंतु खर्चाविचास पाठविलें म्हणजे लाकूडकाम आम्ही करून देऊं. दोन कामें घोंडेयाचीं होणें आहेत. त्यांस किरिस्तावांस खर्चास देऊन त्यास आम्हांकडेस पाठवणें. लाकूडकाम तुम्हीं केलेंत असिलें तरी लेहून पाठविलें पाहिजे. पेशजीचे कामास दीडशें रुपये जाजती देऊं केले, तेंव्हां काम उत्तम चांगलें किरिस्तावांनीं केलें आहे. रुपये आपण न दिले म्हणजे आम्हास खुद पडतील कळलें. पा। बहुत काये लि॥ छ. १५ सवाल हे विनंती.

A letter by Bhikajirao Vichare referring to the temple of Adityeshvar erected at Varavde, requesting Mahadajipant Kane to settle wrth Christian artisans the remaining work of Papadi and Powal, and send money.

---

No. 78

मार्ग. व. ३।१६।६३
डिसेंबर, १४,१७४१

शाहू रोजनिशी भाग १ पान १४१

(२८६) किताफ्त्रें चिटनिशी **बाळंभट** व **विश्वनाथभट** बिन **रघुनाथभट**

इ. स. १७४०।४१
इहिदे अर्बैन
मया व अलफ
जिल्काद १०

**वैद्य** गोत्र गार्ग्य सूत्र आश्वलायन हे स्वामीची सेवा निष्ठेनें करितात. याचें चालवणें अवश्य जाणोन यासि नूतन वतन महालानिहाय.

१ हवेली **दाभोळ** १ तर्फ **चिपळोण** १ तर्फ **सावर्डे**

---

१ सपाट दगडाची फरशी. २ देवळाच्या भोंवतालची भिंत.

१ तर्फ वेळंब १ तर्फ गोहागर १ तर्फ खेडतळवटी १ तर्फ टाळसुरे १ तर्फ पंचनदी १ तर्फ केळशी १ तर्फ वेसरी १ तर्फ नातू पाळवण.

एकुण महाल अकरा सुभा प्रांत दाभोळ येथील सर मोकदमीचें वतन-यासी व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें करून दिल्हें असे. यास वतनास हक्कलाजिमा रयत निसबतीनें.

गावगन्ना महालांनिहाय आकार होईल त्यास रयत निसबतीनें.

नक्ती आकारास दरसदे रुपया १ किराणा जिन्नस आकारास वजनी खंडीस हक्क एक धडा ०।.

ऐन जिनसी आकारास बारुले खंडीस गल्ला तीन पायलीस ००।. एकूण कलमें तीन जकातीस दर बैलास हक्क एक रुका.

गौळियाच्या म्हशीस हक्क सालिना दर म्हैशीस लोणी अच्छेर ००॥.

जलमार्गे गलबतावरून जिन्नस येईल त्यास कैली मापें खंडीस हक्क तीन पायली ०।. वजनी खंडीस हक्क दहा शेर ००।. मीठ बंदरी मीठ पिकले तेथें दर खंडीस हक्क तीन पायली ००।. तेलियाच्या घाणियासी तेल दरमहा हक्क वजन कच्चे अच्छेर ००॥. गावगन्ना हक्क सालिना दर गांवास लोणी एक शे ००१ .इरलें १

गावगन्ना चांमाराकडील जुते दर-साल १.

येणेंप्रमाणें हक्क करून दिला असे. तरी यासी व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन हें पत्र भोगवटीयास याजवळ परतोन देणें. येविशीं पत्रें १४, मार्गशीर्ष बहुळ तृतीया इंदुवासर.

१४।१२।१७४१

An extract of Shahu Rojanishi Part I, page 141, about a Vatan given to Vaidya Brothers by Shahu Chatrapati, in 11 places in Konkan.

---

No. 79

श्री

मार्ग. व. ७।१६६३
डिसेंबर १८,१७४१

श्रीमंत राजश्री बाळंभट बावा व तथा
राजश्री विश्वनाथ बावा स्वामींचे सेवसी

आज्ञाधारक संकराजी कानो साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील वर्तमान ता। मार्गसीर वधी सप्तमी मुा नागपूर स्वामींचे आसीर्वादेंकरून सुखरूप असो विशेष. राजश्री नाना आले, त्यांणीं आपलें पत्र व आपनाकडील आनंदाचें वर्तमान सांगितलें. त्याणेंकरून परम संतोष झाला. यानंतर स्वामीचा यैवज राजश्री तुळजोपंतांकडे रुपये सा हजार होते, त्यास गुदस्ता फाल्गुन मासीं येक हजार दिले. वे तिमाजी जासुदाचे हुंडींत घातले, व यंदा श्रावणमासीं फुलाजी खेमेदोज यासी दिले, येक हजार, व हाली

पाठविले दोन हजार, येकून च्यार हजार रुपये आले. बाकी रुो येव्हां मिलत नाहीं. किती उपाय करतों, परंतु त्यांचें वोढीपुढें लाग चालत नाहीं. किती उपाय करतों ते सर्व लोकास ठाऊक आहे. परंतु काय करावें ! आपले नसिबास यश नाहीं. किती केलें तरी निरफल होतें. बरें, नसिबापुढें जावत नाहीं. वरकड **चांदे** याचें वर्तमान तरी येक हजार रुपये आले. बाकी राहिले तेही दोन महिन्या वसूल करून पाठवितों. स्वामींनीं कमाविसदार ठेविला, तो नष्ट बहुत आहे, तेंही कळों येईल; परंतु आम्ही त्यास मानीत नाहीं. गांवास जाऊन चौकसी करावयाची ते करीतच आहों. स्वामी सेवेसी अंतर करीत नाहीं. आपले चित्तीं निकामी हें परिछिन स्वामीस विदित आहे. त्यास आपण तो जे चाकरी जेणेरीतीनें करावयाची तें करितो. स्वामीचे पदरीं येकतरी माणस खोटेंनाटें असावें. दुसरें, हालीं हुंडी येणेप्रमाणें केली आहे. **चांदे** हजार, रा। **तुळजोपंत** दोन हजार, **पोतदारी** प्रां॥ **पवनी** तीनसे साहा, येकून तीन हजार साहा पैकीं हुंडणावल दरसेकडा रुा ८। सवा आठ प्रमाण दोनसे साडेसतेचालीस. बाकी राहिले साडेआठावन. ते पंधरा दिवसीं येतील. कुलाकडे आहेत. रयतेवर राहिले; वसूल जाला नाहीं, पोतदारीपैकीं राहिले. खरी हुंडी तीन हजारांची, **बालोजा** व **कालोजी** जासुदाबराबरी पाठविली आहे. सेवेसी पोहचेल. वरकड वर्तमान, **चांदाचे** रुा **बहिरोपंत** देत नाहीं. गुदस्ताचे रुपये देत नाहीं. त्यास येक ताकीद श्रीमंतांची घेऊन पाठविली पाहिजे. तेथील **पांडिया** आम्हापासीं आला आहे. त्याणें कांहीं त्याचें लक्षण सागितलें आहे, त्यास घेऊन आम्ही **इसापुरास** जातों. याकरितां येक ताकीद येणेप्रमाणें, **केसोजी पांडिया** इसापुरकर आमचा चाकर आहे, याचे वाटेस कोणी जाईल, तरी आम्हा येवडा वाईट कोणी नाहीं, येसी निंविष्ट ताकीद श्रीमंतांची घेऊन पाठविली पाहिजे. तेणेंकरून **पांडिया** कांहीं **बहिरोपंताचें** गुज सांगेल, आणि आमचे रुपये मिळतील. वरकड कामकाज जें राजश्री **नाना** आज्ञा करितात तें करितों. सेवेसी विदित जालें पाहिजे. राजश्री **झुलाजीपंत** देशमुख आपले सेवेसी गेले आहेत. येथील सर्व वर्तमान निवेदन करितील, त्यावरून विदित होईल. आपण तो यावें तरी आपलीं पत्रें वरचेवरी येतात. जे रुपये तुमच्या मारफातीनें यादीप्रमाणें घेऊन येणें. त्यास त्या यादीपैकीं वराता अगदीं लटक्या जाल्या. **इसापूर** व राजश्री **तुळजोपंताकडील** वसूल होणें. त्यास कांहीं जाला कांहीं होणें आहे. आज्ञा जेणेंप्रकारें होईल तेणेंप्रकारें वर्तणूक करून आज्ञा होईल ते समई चरणापासीं येऊन. आपण जाते समई रुा दोनसें आपणास देविले त्यास **चांदे**पैकीं रुा १०० मना जाले. रा। **तुळजोपंता**पैकीं रुा १०० पावले. संभरांनीं दोन वरसें जालीं, कसें पोट भरावें. आणि घरास काय पाठवावें. सर्व स्वामीस विदित आहे. कांहीं बेगमी केली पाहिजे हे विज्ञापना.

Shankaraji Kano explains his difficulties to Vishvanathbhat in recovering the dues from Tuljopant, and the revenue of Chande from Bahiropant. I obey Naro Anant Gadre. Zulajipant, who is come to you, will explain everything. The writer was displeased with the remuneration he got, as it was difficult to maintain the family with it.

No. 80 श्री मार्ग. वद्य ९।१६६३
डिसेंबर २०, १७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **विस्वनाथबावा वैद्य** स्वामीचे सेवेसी.

सेवेक **निळो रघुनाथ** कृतोनक सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। मार्गसीर वद्य नवमीपावेतों मु। नजिक **गलगले** श्रीकृष्णातीर येथें सुखरूप असो, जाणौन स्वकीयें कुशललेखन करीत आसिलें पाहिजे. विशेष वेदमूर्ति राजश्री **बाळजोसी गाडगीळ वेळणेस्करकर** यांसि, श्रीमंत राजश्री **जानोजीबावा** यांणीं वर्षासनापैकीं राजश्री **हरीपंत सरदेशमुख** यांजवर वरात रुपये साहासेची दिल्ही आहे, तरी सदरहू यैवज वेदमूर्तीस आपण उगवून द्यावा. रा। **हरीपंत** यांस आपण पत्र द्यावें व रा। **रंगोपंत** तुमचे तेथें आहेत त्यांस पत्र देऊन मशारनिलेकडून यैवज उगवून घेऊन आपण हारयेक कावा करून यैवज वेदमूर्तीस पोहोचे तो अर्थ करणें. आपण तो ब्रह्मकार्यास चुकणार नाहीं. स्वामीचा भरोसा जाणोन हें पत्र लिहिलें आहे. तरी आगत्य आगत्य यासी यैवज पोहोचे तें करणें. अनमान सहसा न कीजे. बहुत काय लिहिणें कृपालोभ असो दीजे हे विनंती.

This is a letter written by Nilo Raghunath Vaishampayan from Galgale to Vishwanathbhat, requesting to try his best to help Bal Joshi Gadgil of Velneshwar to get his Varshasan from Bhosle.

---

No. 81 श्रीलक्ष्मीकांत २३ सवाल
मार्ग. व० १०।१६६३
डिसेंबर २१,१७४१

राजश्री **बाळंभट व विश्वनाथभट वैद्य** गोसावी यांसी.

श्रो **निंबाजी वायेसे** दंडवत विनंती सु। इसने आर्बैन मया आलफ. तुम्हाकडील कर्जाचे यैवजपैकीं बाकी रु। ४९० चारसे नवद. त्यांजपैकीं येणेंप्रों देणें ता। जामदार.

| | | | |
|---|---|---|---|
| २॥ | बजू नाहावी | २ | मुदचेली |
| २ | परीट | ७॥· | दिवटे[१] |
| २॥. | खासबारदार | २ | पखाली |
| ५ | **दिवाकर भट** | १॥· | तमाखूंगुल[२] |
| २९ | खा। समई २ | ३॥· | गु। जासूद |
| २२ | **कृष्णराव** | १० | **माहादसेट** तूप (म)ण |
| ६० | **कृष्णा जामदार** | | |
| | ५९ मा।निले | २६॥· | |
| | १ **दादू** खिजमतगार | | |
| | ६० | | |
| १२३ | | | |

रु। १४९॥. येकसे साडे येकुण पणास देणें.

छ· २३ सवाल बहुत काय लिहिणें हे विनंती.




मोर्तब
दुहेरी
वाटोळे

---

१ स्वयंपाकी, आचारी. २ विडी पेटविणेची गुलकाडी.

No. 82 श्रीलक्ष्मीकांत मार्ग. व. १०।१६६३
डिसेंबर २१, १७४१

राजश्री **बाळंभट व विश्वनाथभट वैद्य**—गोसावी यांसि

श्रो **निंबाजी वायेसे** दंडवत विनंती सुा इतेन आर्बैन मया आलफ. तुम्हाकडील कर्ज रुा तीन हजारपैकीं बाकी ४९० च्यारसे नवद, त्यायैवजी येणेप्रों देणें.

| | |
|---|---|
| ८६ जासूद नाईक ३ | २१॥ निा प्रतापजीबावा |
| ४६ खिजमतगार | १० मुनशी |
| ८ जामदार ३ | ३ रखतेवान |
| १४० | ३४॥ |

रुा १७४॥ येकसे साडेचवऱ्याहतर देणें छ २३ सवाल
बहुत काय लिहिणें हे विनंती.

मोर्तब सुरु

मोर्तब
दुहेरी
वाटोळा

---

No. 83 श्रीलक्ष्मीकांत २३ सवाल
मार्गशीर्ष वाा १०।१६६३
डिसेंबर २१,१७४१

राजश्री **बाळंभट** व **विश्वनाथ भट** गोसावि यासी.

श्रो **निंबाजी वायेसे** दंडवत विनंति सुा इसने आर्बैन मया आफल. तुम्हांकडील कर्जाचे यैवजी बाकी रु॥ ४९० च्यारसे नवद, त्याजपैकीं येणेप्रों देणें.

| | |
|---|---|
| २४ चोपदार | ६ फरास पीर महंमद |
| ६ भालदार | १३ ढलाइत |
| १० पीलखाना | ५ रिकिबदार व चावीदार |
| २ हलालखोर | २४ |
| ४२ | |

रुा ६६ सासष्ट देणें. छ २३ सवाल. बहुत काये लिहिणें हे विनंती.

मोर्तब सुद

मोर्तब
दुहेरी
वाटोळा

---

१ शाईवाला, पाटपाणी करणारा.

No. 84 श्रीलक्ष्मीकांत २३ सवाल
मार्गशीर्ष वा १०।१६६३
डिसेंबर २१, १७४१

राजश्री **बालंभट व विश्वनाथभट वैद्य** गोसावि यांसी.

श्रो। **निंबाजी वायेसे दंडवत** विनंती सुा इसने आर्बैन मया आलफ. तुम्हांकडील कर्जाचे यैवजपैकीं बाकी रुा ४९० पैकीं येणेप्रमाणें देणें.

**५० मलाणी नाा भोई ५० घीसा नाईक भोई.**

रुा सेंभर देणें छ २३ सवाल. बहुत काये लिहिणें हे विनंति.

Nimbaji Wayse requests Vaidya brothers in letter nos. 81 to 84 to pay money to different persons and to buy certain articles out of Rs. 490 due from them.

---

No. 85 श्री पौष शु. ४।१६६३
डिसेंबर ३०,१७४१

राजश्रि याविराजित राजश्री **राघोबा नाा दरवे** स्वामी गोसावी यांसी.

पेाा **बालंभट व विस्वनाथभट वैद्य** कृतानेक साां नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन करीत गेलें पाहिजे. यानंतर **श्रीआदित्येश्वर मौ लावगन सांडे** येथील देवलावर ईट घालावयाविसीं राजश्री **हवालदारास** लिहिलें आहे, व राा **अताजीपंत गद्रे** यांसीं लिहिलें आहे. त्यांस तेथें खर्चास पाहिजे, याजकरितां तुम्हांस लिहिलें आहे. तरी आमचे यैवजपैकीं रुा ५० पनास मारानिले **अंताजीपंत** मागतील त्यापासीं देणें. जरूर जाणौन लिहिलें आहे. देवलाचें काम आहे. यास्तव लिहिलें आहे.
+
मिा पौष्यसुघ ४ चतुर्थी दुर्मति सवछरे. बहुत काये लिहिणें लोम असो दीजे हे विनंति.

A letter by Balambhat to Raghoba Darve requesting to pay Rs. 50 to Antajipant Gadre to defray the expenses of bricks used for the building of the temple of Adityeshwar at Sande Lawagan alias Gadre Lawagan.

---

No. 86 श्री शु. १६६३
स. १७४१

राजश्री **हैबतराव सोमवंशी** गोसावी यांसि.

छ अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य श्रो **बाळंभट व विश्वनाथभट वैद्य** आसीर्वाद. उपरी येथील कुशल जाणौन स्वकीयें कुशललेखन करीत जाणें. यानंतर तुम्हाकडे आमचें रुा येणें, यास्तव **गिरमाजो सिंदा** तुम्हाकडे पाठविला आहे त्यास अद्याप रुा देऊन रवानगी केली नाहीं. यावरून काय म्हणावें ! याउपर सत्वर त्याची रवानगी करून देणें. रुपयेयाची हुंडी करून देणें. रोकड न देणें. विशेष आम्हाकडे **नारोबा** ब्राह्मण आहे. हा गरीब आहे याचें लग्न करणें लागतें. त्याबद्दल तुम्हाकडे पाठविला आहे. तरी यासि आपणाकडून हरइलाज करोन सेद्रीडसे रुपये करून दिलियानें याचें लग्न होईल. म्हणजे श्रमी तुमचे पदरीं पडेल. तरी जरूर जाणून हस्तें परहस्तें करून याचें साहित्य करून दीजे. ब्राह्मणाचें लग्न केलियानें विशेष कीर्त पुण्य आहे. तुम्हास लिहिणें नलगे. सूचना लिहिली आहे. बहुत काये लिहिणें.

Vaidya brothers ask Haibatrao Somavansi to send the debt with Girmaji Shinde & not to detain him any longer. A poor Brahmin Naroba, our servant, is sent to you. He wants money to marry. He should get Rs. 100 or so, they expected, by any means, from him.

---

No. 87 श्री १६६३ १७४१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बाळंभट व विश्वनाथभट वैद्य** स्वामी गोसावी यासि.

सेवक। **कोनेर राम सां** नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयें लेखन करीत जाणें. विशेष तुम्हीं पत्र पाठविलें, तें प्रविष्ट जालें. लेखनार्थ श्रवण होऊन चितावास जाहाला. राजश्री **राणोजी बावा** याजकडील मामलीयाविसीं लिहिलें तरी आम्हास गुंत्यामुळें आठचार दिवस इकडे लागले, याजकरितां त्याची वोढी जाहाली व कितेकांनीं घालमेली केली; परंतु आपण तेथें होते। त्यामुळें गोत्य राहिली; तरी सर्व प्रकारें आपणच तेथें आहेत. भरंवसा आपला आहे. तूर्त रसदेश **मल्हारराम** यांसमागमें यैवज पाठविला आहे, त्यांपैकीं आपले विध्यमानें दिल्हा असेल, तो सावकाराचा वारून, राहिला रसदेचा यैवज त्याजकडे घावा व हमी द्यावी, येविसीं राजश्री **रघूजी बावांनीं** तुम्हांस लिहिलें आहे. तरी गुदस्ताप्रों त्याची हमी तुम्ही देऊन सनदा राजश्री **बालाजीपंताचे** स्वाधीन करणें. इतकियांत आम्ही लवकरींच येतों. तेथें। आलियावरी तुमचे आमचे विचारें निर्गभ
+
होणें तो होऊन येईल. सर्व भरोसा तुमचा आहे. बहुत काये लिहिणें. हे विनंति.

Konerram Kolatkar writes from Karnatak to Vaidya brothers that it was a fortunate thing that in his absence he arranged to pay the money to be paid for the Mamlat of Ranoji's village. He sent with Malharram an amount which will be used to repay the money borrowed from bankers and pay also some amount of rasad. Raghuji Bhosle wrote to them also to take the responsibility of paying the amount of rasad to Ranoji as they did last year.

---

No. 88 श्री १६६३ १७४१

श्रीमंत रा। **विश्वनाथभट वैद्य** स्वामीचे सेवेसी.

सेवक **विसोबा ना। सहस्रबुधे** सां। नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणोन स्वानंद लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. तुम्ही पूर्वी रा। **रामाजी पंतांचे** देवाचे कामावर होते, उत्तम कारीगार आहेत. तर त्याहाचे हातून कामकाज घेतलें पाहिजे. बहुत काये लिहिणें. कृपालोभ आसो दीजे हे विनंति.

Visoba Naik Sahasrabudhe requested Vishwanathbhat to engage Ramaji somewhere as he was found to be competent in getting the temple of Pant Sachiv, duly built.

---

## वाईचे वैद्य ( लागवनकर ) कुलांतील ऐतिहासिक पुरुष-व्यक्तींच्या कर्तबगारीच्या कारकीर्दींचा कालदर्शक तक्ता

| अनु-क्रम नंबर | व्यक्तींचें नाव | इसवी सन काल व त्यांतील कर्तबगारीचा स्थूल उल्लेख | कारकीर्दींचीं एकूण वर्षें | कोष्टक ४ मधील कालांतील राजशासनिक व्यक्ति व त्यांच्या कारकीर्दींचीं वर्षें | | | | इंग्लिश आमदानी | एकूण वर्षें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | छत्रपति | एकूण कारकीर्द वर्षें | पेशवे | एकूण कारकीर्द वर्षें | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | भास्कर रघुनाथ | १७०८–१७३८<br>सावकार व छत्रपतींचे सल्लागार | ३० | शाहूमहाराज | ३० | निळोजी पिंगळे<br>बाळाजी विश्वनाथ<br>बाजीराव बल्लाळ | ६<br>६<br>१८ | ० | ३० |
| २ | बाळंभट रघुनाथ | १७०८–१७५३<br>छत्रपतींचे सल्लागार, धार्मिक कृत्यांचे व्यवस्थापक व सावकार | ४५ | शाहूमहाराज<br>(१७०८–१७४९)<br>रामराजे ( राजारामाचे नातू )<br>(१७४९–१७५३) | ४१<br><br><br>४ | निळोजी पिंगळे<br>बाळाजी विश्वनाथ<br>बाजीराव बल्लाळ<br>नानासाहेब | ६<br>६<br>२०<br>१३ | ० | ४५ |
| ३ | विश्वनाथ रघुनाथ | १७१४–१७६०<br>छत्रपतींचे सल्लागार, सावकार व नागपूरकर भोसल्यांचे दरबारी वकील | ४६ | शाहूमहाराज<br>रामराजे | ३५<br>११ | बाळाजी विश्वनाथ<br>बाजीराव<br>नानासाहेब | ६<br>२०<br>२० | ० | ४६ |
| ४ | रामचंद्र बल्लाळ | १७६१–१७६९<br>पेशव्यांस व सरदारांस कर्ज पुरविणारे सावकार | ८ | रामराजे | ८ | थोरले माधवराव | ८ | ० | ८ |

| ५ | बाबूराव विश्वनाथ | १७६१–१७९५<br>भोसले दरबारीं मराठी दरबारचे वकील व पेशव्यांच्या कारकीर्दींत नाना फडणवीसाचे विश्वासू राजकीय सल्लागार | ३४ | रामराजे<br>धाकटे शाहू-महाराज | १६<br>१८ | थोरले माधवराव<br>नारायणराव<br>सवाई माधवराव | १२<br>१<br>२१ | [illegible] | २८ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६ | कृष्णाजी बल्लाळ | १७६९–१८२७<br>सावकारी, सांसारिक जीवन, सातारा तालुक्याचे मामलेदार व जिल्ह्याचे फडणवीस | ५८ | रामराजे<br>धाकटे शाहू-महाराज<br>प्रतापसिंहमहाराज | ८<br>३१<br>१९ | थोरले माधवराव<br>नारायणराव<br>रघुनाथराव<br>सवाई माधवराव<br>बाजीराव (दुसरे) | ३<br>१<br>१<br>२१<br>२३ | ९ | ५८ |
| ७ | नारायणराव बाबूराव | १७८७–१८२८<br>नाना फडणवीसाचे चिटणवीस, विश्वासू सल्लागार व भोसल्यांचे दरबारीं पेशव्यांचे वकील व भोसल्यांचे सल्लागार | ४१ | धाकटे शाहू-महाराज<br>प्रतापसिंहमहाराज | २१<br>२० | सवाई माधवराव<br>बाजीराव (दुसरे) | ८<br>२३ | १० | ४१ |
| ८ | माधवराव बाबूराव | १७९०–९३<br>नाना फडणवीसांचे चिटणवीस, भोसल्यांचे दरबारीं पेशव्यांचे वकील | ३ | धाकटे शाहू-महाराज | ३ | सवाई माधवराव | ३ | ० | ३ |
| ९ | रघुनाथ कृष्ण | १७९०–९७<br>परशुरामभाऊ पटवर्धनांचे जांवई, रणधुरंधर | ७ | धाकटे शाहू-महाराज | ७ | सवाई माधवराव<br>बाजीराव (दुसरे) | ५<br>२ | ० | ७ |
| १० | आनंदराव बाबूराव | १७९५–१८५२<br>भोसले दरबारीं वकील | ५७ | धाकटे शाहू-महाराज<br>प्रतापसिंहमहाराज | १३<br>३१ | बाजीराव (दुसरे) | २३ | ३४ | ५७ |

No. 89 श्री १६६२
१७४१

राजश्रियाविराजित राजश्री **विस्वनाथभट वैद्य** स्वामी गोसावी यासि.

पो. **सिवाजी नारायेण** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. उपरी. चिरंजीव **रामचंद्रास** आणावयासी **मलटणास** माणसें रवाना केलीं होतीं, त्यांस आजि सोमवारीं ते आले, त्यांस लग्नाकरितां **सातारियास** यावें लागतें. त्यास बुधवारीं प्रातःकाळीं येथून निघावयास मुहूर्त आहे, तर आपल्या पालख्या मंगलवारीं येथें येत यैसें केलें पाहिजे. बहुत काये लिहिणें कृपा असो दीजे हे विनंति.

हो **कृष्णास** नमस्कार. तुम्ही राजश्री **राघोपंत** यांच्या घरास जाऊन पाढाळें व पालखी त्याची, वह्मा यैसें रवानगी करणें. जाणीजे. बहुत काये लिहिणें हे विनंति.

Shiwaji Narayan Bhawye writes to Vishwanathbhat that Ramchandra has come from Malatan to attend the marriage at Satara. A palanquin should, therefore, be secured from Raghopant and sent there on Tuesday, so that he would start on Wednesday.

---

No. 90 श्रीशंकर १७४१-४२

राजश्रियाविराजित राजमान्ये राजश्री **बालंभट बावा** ( व ) **विश्वनाथ बावा वैद्द** स्वामीचे सेवेसी.

सेवक **कासी काकाजी बरडे** सां। नमस्कार विनंती उपरी. पेसजी आपण पत्र पाठविलें तेथ लिहिलें कीं, राजश्री **माणकोपंत खटावकर** यास रुा दीजे म्हणून लिहिलें. त्यांस आम्ही आपल्यास पत्र लिहिलें कीं, रुो पावलेस बाकी पाच व्याज आम्हांवर पडलें म्हणून लिहिलें, तें दूर करून बाकी यैवज मारनुलेस देवविला पाहिजे. ते येकीकडे ठेऊन लिहिलें. कीं, फारखत पाठविलें, घेनें. आणि रुये १२२॥ येकसे साडेबाविस दीजे म्हणून लिहिलें. त्यांस आतां माघोरे लावावें तरी आमचा ग्रहस्तपन राहात नाहीं; यामुळें आपल्या हिसेबावरून मुदल बाकी रुा ७४, व्याज रुये येकंदर रुा व्याज पैकीं सोड रुा ४ च्यार घेऊन बाकी सत्तर, येकूण रुये ११६ येकसेसोला पदरीं घातले. आणि आपले फारखत घेतलें. अमच खत रद्द म्हणून लिलें, त्यावरून सदर यैवज पदरीं घातले. बहुत काये लिहिणें. लोभ असो दीजे ही विनंती.

Kasi Kakaji Barade was asked by Vaidya brothers to pay Rs. 122-8 to Manakopant Khatavkar, but he paid the amount by deducting Rs. 4-8. Both persons were new money dealers with Vaidyas.

---

## वैद्य दफ्तरांतून निवडलेल्या खंड ३ च्या कागदांची सूचि

# व्यक्ति-सूचि

**सूचना :—** १ नांवासमोरचे आंकडे पत्राच्या क्रमांकाचे आहेत.
२ अनुक्रम लावतांना अनुस्वार विचारांत घेतला नाहीं.

---

# स्थल-सूचि